# सांगण्या पलीकडची गोष्ट

## (श्रीरामानंद बीडकर महाराजांचे मराठी चरित्र)

**डॉ. गो. रा. कुलकर्णी**
एम्. ए., पीएच्. डी., डी. लिट्.

*प्रकाशक* : श्री. विलास चंद्रकांत गावकर
१८१/१६, जेर बिल्डिंग,
डॉ. आंबेडकर रोड, परेल, मुंबई.

*मुद्रक* : एस्कायर प्रेस प्रायव्हेट लि.
मोहत्ता भवन, दुसरा मजला,
डॉ. ई. मोझेस रोड, वरळी, मुंबई - ४०० ०१८

*अक्षर संयोजन* : श्री. अमित गो. कुलकर्णी, सांगली - ४१६ ४१६
दूरभाष : २३३२०८९



*प्रकाशन तिथी* : फाल्गुन व॥ १०, शक १९२९
***श्रीसद्गुरू बीडकर महाराज पुण्यतिथी***
मंगळवार, दि. १ एप्रिल २००८

मूल्य : रु. १३०/-

# भूमिका

संत सत्पुरुष हे भगवंताचे अवतार असतात. ते भगवंताचे मानवी रूप असतात आणि भक्तांच्यावर कृपा करण्यासाठी अवतरित होत असतात. अशा सगुण चरित्राचे पवित्र भक्ति-भावनेने कथन-पठण-गायन व निरूपण केल्यामुळे भगवद्-भक्तीचे भाग्य प्राप्त होते.

प्रत्यक्ष भगवान श्रीदत्तात्रेयांचे अवतार अक्कलकोटनिवासी श्रीस्वामी समर्थ यांचे शिष्योत्तम असलेल्या श्रीरामचंद्र (श्रीरामानंद) बीडकर महाराज यांचे चरित्र लोकविलक्षण व लोकोत्तर आहे. जीवनातील मोठमोठ्या अनेक चढ-उतारांवरून जात त्यांनी आध्यात्मिक उत्कर्ष प्राप्त केला होता. त्यांचे जीवन-चरित्र हे मानवी जीवनात महत् प्रेरणा जागविणारे आहे.

श्रीस्वामी समर्थ यांच्या स्वरूप संप्रदायामध्ये श्रीबीडकर महाराज यांचे महत्त्वपूर्ण स्थान आहे. श्रद्धाळू भक्तांना त्यांची ओळख व्हावी, म्हणून प.पू. श्रीअशोककाका जोशी महाराज यांनी श्रीबीडकर महाराजांचे सुटसुटीत चरित्र लिहिण्याची आज्ञा केली व मार्गदर्शन केले. त्यांचा मी ऋणी आहे.

या चरित्र-ग्रंथांसाठी १) गोपाळबुवा केळकरकृत श्रीस्वामी समर्थ बखर, २) श्रीदिगंबरदास महाराजकृत संक्षिप्त सद्गुरू-चरित्र, ३) श्रीदिगंबरदास महाराजकृत श्रीबीडकर महाराज - ओवीबद्ध चरित्र, ४) रावसाहेब माझा मोतीदाणा, ५) ल. ग. बापटकृत श्रीसद्गुरु रामानंद बीडकर महाराज चरित्र, ६) शं. द. रबडेकृत श्रीरामानंद बीडकर, ७) सद्गुरू चरणाखाली - संपादक : डॉ. अजित कुलकर्णी, ८) डॉ. दि. दा. देशपांडेकृत आत्मचरित्र इत्यादी ग्रंथांची मदत घेतली आहे. लेखक सर्वांचा आभारी आहे. या ग्रंथासाठी डॉ.सौ. अवंतिका कुलकर्णी, श्री. विजय सरवटे व श्री. विजय जोशी यांचे मोलाचे सहकार्य लाभले. त्यांना धन्यवाद.

सद्गुरू बीडकर महाराज यांचे चरित्र लिहिण्याची संधी लाभली, ही मोठी भाग्याची गोष्ट आहे. ही त्यांचीच कृपा आहे. भक्त-जनांना हे चरित्र आवडेल, अशी आशा आहे.

- लेखक



# अनुक्रमणिका

# १. कुल-परंपरा

**श्रीस्वामी समर्थ**

प्रत्यक्ष भगवान श्रीदत्तात्रेय हे आधुनिक काळात श्रीस्वामी समर्थ यांच्या रूपाने मंगळवेढा येथे प्रकट झाले. नंतर ते अक्कलकोटमध्ये जाऊन राहिले. तेथील राजे मालोजीराजे भोसले हे त्यांचे अनन्य भक्त बनले. तेथे श्रीस्वामी समर्थांनी अनेक लीला केल्या. ते अक्कलकोटमध्ये राहिले म्हणून त्याना अक्कलकोट स्वामी असे म्हटले जाते. ते प्रत्यक्ष श्रीमत् नृसिंह सरस्वती होते. श्रीदिगंबरदास महाराज म्हणतात, "प्रत्यक्ष दत्तात्रेय व कैलासनाथ सदाशिव हेच श्रीमत् नृसिंह सरस्वती होते. तेच अक्कलकोट निवासी स्वामी समर्थ महाराज होत, हे जाणून घ्या. श्रीस्वामी समर्थ हे देवाधिदेव आहेत, हे पक्के ध्यानात घ्या. खऱ्या भक्तीने ज्याला याचा अनुभव येईल, त्यालाच हे सत्य समजून येईल."

श्रीस्वामी समर्थांनी असंख्य भक्तांवर कृपा केली. त्याचे अनेक शिष्य प्रसिद्धीस आले, त्यामध्ये मुंबईचे श्रीस्वामीसुत महाराज ऊर्फ हरिभाऊ, अक्कलकोटचे श्रीबाळाप्पा महाराज, कोल्हापूरचे श्रीकृष्ण सरस्वती, नगरचे श्रीनाना रेखी आणि पुण्याचे श्रीबीडकर महाराज इत्यादी प्रमुख आहेत. या प्रमुख शिष्यांमध्ये त्यानी श्रीबीडकर महाराज याना सर्वांच्या शेवटी आपले शिष्य बनविले. श्रीबीडकर महाराज त्यांच्या चरित्रामध्ये भोग आणि योग, आसक्ती आणि विरक्ती यांचा चढउतार आणि उलथापालथ इतकी दिसून येते की आपण थक्क होऊन जातो. सर्वजण त्यांचा आध्यात्मिक अधिकार मान्य करीत असत.

**पूर्वज**

श्रीसद्गुरू बीडकर महाराज हे पार्थगोत्री देशस्थ ब्राह्मण होते. ब्राह्मण होते, परंतु त्यांचे घराणे पेशाने सरदारांचे होते. त्यांच्या वडिलांचे नाव बळवंतराव आणि आईचे नाव गंगूबाई असे होते. त्यांना दोन मुले व चार मुली होत्या.

श्रीमहाराज हे सर्वांत लहान होते. त्यांचा जन्म माघ शुक्ल सप्तमी, मंगळवार, (अष्टमी क्षय), शक १७६० (दि. २२ जानेवारी १८३८) रोजी दुपारी झाला. त्यांचे नाव रामचंद्र असे ठेवले, परंतु नंतर त्यांना रामानंद असे नाव दिले गेले. प्रत्यक्ष दत्तात्रेयांनी त्यांचे हे नाव ठेवले होते.

श्रीरामानंद महाराज यांच्या पूर्वजांची गोष्ट मोठी विलक्षण आहे. या घराण्याचे मूळ पुरुष होते शंकरराव. त्यांचे पुत्र माणकोजीपंत मोठे शूर व बुद्धिमान होते. ते सम्राट अकबराचे दिवाण होते. त्यांचे पुत्र गजाननराव हे एलिचपुरास आले आणि त्यानी तेथील शहाला आपली कर्तबगारी दाखविली. त्याना तेथे इनाम म्हणून काही गावे मिळाली. ते तेथील सरदार झाले. त्यानी मोठी धन-दौलत मिळविली आणि मोठे नाव कमाविले.

परंतु त्याना अपत्य नव्हते. अपत्य-प्राप्तीसाठी त्यानी देव-धर्म केला. एका अवलियाच्या कृपा-प्रसादाने त्याना एक मुलगा झाला. विलक्षण गोष्ट अशी की त्या मातेने मुलाबरोबर एका नागाला जन्म दिला. तो नाग घरातीलच बनून राहिला. गजाननराव जेव्हा पूजेला बसत तेव्हा तो त्यांच्याजवळ जाऊन बसे. आई जेव्हा आपल्या मुलाला दूध पाजत असे, तेव्हा तोही तिच्या मांडीवर जाऊन बसे. मुलाबरोबरच तो नाग वाढत होता.

सात वर्षानंतर गजाननरावांनी आपल्या मुलाची मुंज मोठ्या उत्साहाने केली. मुलाची आत्या चुलीतील निखारे घेऊन बाहेर जात होती. घाईघाईने तिने ते एका कढईत ओतले. तेथे तो नाग वेटोळे घालून बसला होता. निखारे पडताच तो तडफडून मेला आणि तिकडे तो मुलगा ऐनवेळी वेदीवर अचानक मूर्च्छित होऊन पडला. मोठ्या तपस्येने मिळालेला मुलगा अचानक गेल्यामुळे आई-वडिलांना फार दु:ख झाले. ते संसारातून विरक्त झाले व धार्मिक कार्यात मग्न झाले.

काही दिवसांनंतर तो नाग आईच्या स्वप्नात आला. तो म्हणाला की जिने मला भाजून मारले, तिचा वंश मी चालू देणार नाही आणि तुझा वंशसुद्धा सात पिढ्यांपर्यंतच चालू ठेवीन. आपला वंश सात पिढ्यांपर्यंत तरी चालू राहणार, या कल्पनेने गजाननराव आणि त्यांच्या पत्नीला समाधान वाटले. पुढे त्यांना मुलगा झाला. त्याचे नाव कृष्णाजीपंत होते. तोही आपल्या वडिलांप्रमाणे शूर होता. एलिचपूरचा सरदार म्हणून त्याने मोठे नाव मिळविले. शाहाकडून त्याला एदलाबाद आणि रावेर येथील महालदारी मिळाली.



कृष्णाजीपंतांचे चिरंजीव विश्वनाथराव हे अहमदनगरच्या प्रदेशात येऊन राहिले. त्यानी तेथील कांबरगाव व चांभुरडी गावच्या कुलकर्ण पदाच्या इनामाचे हक्क मिळविले. त्यांनी खूप संपत्ती मिळविली व मोठमोठे महाल बनविले. त्यांचे चिरंजीव माधवराव हे फार मोठे शूर निघाले. त्यांनी बहादूरी दाखवून हैद्राबादच्या निजामाकडून चाळीस हजाराची जहागिरी मिळविली. त्याना बीड शहराचा पोतदारी हक्कही मिळाला. ते हैद्राबादच्या निजामाचे प्रामाणिक सेवक होते. पोतदारीमुळे त्याना पोतदार हे नाव मिळाले.

माधवरावांचे चिरंजीव विनायकराव हे मोठे कुशल कारभारी होते. त्यानी आपल्या पूर्वजांची जहागीरी राखली व काटेमार्डीची (सोलापूर) सुभेदारीही मिळविली. ते करकमभोसे या गावी स्थायिक झाले. त्यांचे चिरंजीव चिंतामणराव यानी मोठ्या कौशल्याने वडिलोपार्जित संपत्ती संभाळली. त्याना अपत्य नव्हते, म्हणून धार्मिक कृत्ये व तीर्थ-यात्रा यामध्ये रमू लागले. त्यानी अनेक तीर्थक्षेत्रांमध्ये धर्मशाळा व घाट बनविले. काशीमध्ये त्यानी जो घाट बनविला आहे, त्याला 'माणको शंकर घाट' असे म्हणतात. काशीमध्ये गंगेत स्नान करताना त्यांना एकदा हनुमानाची मूर्ती सापडली. ही ईश्वराची कृपा समजून त्यांनी मोठ्या प्रेमाने हनुमंताची सेवा आरंभिली. त्या सेवेचे फळ म्हणून त्यांना म्हातारपणी मुलगा झाला.

चिंतामणरावांच्या चिरंजीवाचे नाव मुकुंदराव असे होते. ते मोठे शूर-वीर होते. ते मुसलमानी राज्याचे सरदार व सल्लागार होते. खर्ड्याला सवाई माधवराव पेशवे व हैद्राबादचा शहा यांच्यामध्ये मोठी लढाई झाली. त्यात पेशव्यांनी शहाचा पराभव केला. तेव्हा शहाचे सल्लागार असलेला मुशीर उल् मुल्क व मुकुंदराव याना पेशव्यांनी कैद करून आणले आणि त्याना नजर कैदेत ठेवले. तेव्हा मुकुंदरावांचे मन राजकारणाला विटले व ते आपला वेळ धार्मिक कार्यात घालवू लागले. ते काही काळ मराठवाड्यातील बीड येथे राहात होते, म्हणून त्याना बीडकर असे म्हणू लागले. पुण्यात ते आपला वेळ महाभारत,

भागवत, रामायण यासारख्या ग्रंथांचे वाचन व श्रवण यांच्यामध्ये घालवीत असत. त्याना बळवंतराव व माधवराव असे दोन मुलगे होते.

सवाई माधवराव पेशवे यांचे निधन झाल्यावर मुशीर उल् मुल्क हे पुण्याहून परत गेले. त्यानी मुकुंदरावांनाही बरोबर येण्याचा आग्रह केला, परंतु मुकुंदरावांनी नकार दिला. आणि म्हणाले की, "पेशव्यांच्या परवानगीशिवाय परत गेलो तर शहा नाराज होईल. तेव्हा असे पळून जाणे योग्य नव्हे." मुकुंदरावांनी आपल्या मुलानाही हैद्राबादला जाण्यास मनाई केली. नंतर पेशव्यांच्या गादीवर दुसरे बाजीराव हे बसले, तेव्हा मुकुंदरावांनी बीडला परत जाण्याची परवानगी मागितली, परंतु दुसरे बाजीराव पेशवे यानी त्यांची योग्यता पाहून त्याना आपल्या सेवेतच राहण्याची आज्ञा केली. त्यानी मुकुंदराव यांचे थोरले चिरंजीव बळवंतराव याना पलंग व पूजा यांचे संरक्षण व नांदुरकीच्या किल्ल्याच्या देखरखीचे काम सोपविले. धाकटे चिरंजीव माधवराव यांना कोकणच्या सुवर्णदुर्ग तहसिलीचे काम दिले. काही वर्षानंतर माधवरावांचे आकस्मिक निधन झाले. त्याना मूल-बाळ नव्हते. मुकुंदरावांच्या वाट्याला म्हातारपणी पुत्र-वियोगाचे दु:ख आले. त्यांना नागाच्या शापाची आठवण झाली. त्यांनी घराण्याची जबाबदारी बळवंतरावांना दिली व ते स्वत: भगवद्‌भजनास लागले.

### श्रीमहाराजांचे वडील बळवंतराव

श्रीबीडकर महाराजांचे वडील बळवंतराव हे धिप्पाड व साडे सहा फूट उंच होते. आपल्या कामात प्रामाणिक व वाकबगार होते. घोडेस्वारी व निशाण बाजीत तरबेज होते म्हणून दुसऱ्या बाजीराव पेशव्यांनी त्याना आपला अंगरक्षक नेमले. एकदा पेशव्यांवर हल्ला झाला. त्या वेळी बळवंतराव यानी जिवावर उदार होऊन शत्रूला पराजित केले. त्यांचे पहिले लग्न अयशस्वी झाले म्हणून पेशव्यांनी त्यांना दुसऱ्या लग्नासाठी पैसे दिले. त्यांचा विवाह वाघुलीच्या व्यंकटराव कुलकर्णी यांची मुलगी गंगूबाई हिच्याशी झाला. त्याना दोन मुलगे व चार मुली होत्या. एक मुलगी लहानपणीच वारली आणि इतर तीन या अपत्यहीन राहिल्या. मोठा मुलगा बापू नावाचा होता व छोटा रामचंद्र. रामचंद्र हा वडिलांचा खूप आवडता होता.

बळवंतरावांची तब्येत चांगली होती व त्याना दीर्घ आयुष्य लाभले होते.



ते ९९ वर्षांचे होऊन गेले. या दरम्यान पेशवाई बुडाली आणि इंग्रजांचे राज्य आले. इंग्रजांच्या एल्फिन्स्टन साहेबाने बळवंतरावांना पेन्शन देऊ केली, परंतु त्यानी ती नाकारली. त्यानी विचार केला की, आजवर पेशव्यांचे अन्न खाल्ले आणि आता बेइमान होऊन मेंच्छांची भाकरी कशी खायची? त्यानी आपल्या आयुष्यात पूर्वजांनी मिळविलेल्या संपत्तीकडे लक्ष दिले नव्हते. पैसाही साठविला नव्हता, म्हणून त्यांच्या मृत्यूच्या वेळी थोडासाच पैसा उरला होता, परंतु गंगूबाईने हिम्मत सोडली नाही. इंग्रजांनी तिला शंभर रुपये पेन्शन देण्याची आज्ञा केली, पण त्या स्वाभिमानी स्त्रीने ती नाकारली.

बळवंतरावांच्या तेराव्यालाच मोठा मुलगा बापू हा बेपत्ता झाला. त्याचा अनेक वर्षे पत्ता लागला नाही. घरात दूध देणारी पांढरी गाय होती. ती कुठे तरी निघून गेली. या वाईट परिस्थितीत गंगूबाईंनी मोठे धैर्य दाखविले. लहान रामचंद्राला शाळेत घातले.

* * *

**श्रीरामानंद उवाच**

ब्रह्मदेवही कुणाचे आयुष्य वाढवू किंवा कमी करू शकत नाही. प्रारब्ध हे भोगावेच लागते. आत्महत्या करूनही प्रारब्ध चुकविता येत नाही. आत्महत्येचे पाप पुन्हा भोगावेच लागते. म्हणून भगवंताला शरण जा. दुसरा कोणताही उपाय नाही.

# २. बालपणीचे दिवस

**शाळेमध्ये**

रामचंद्राचे शिक्षण सुरू झाले. गुरुजींनी गृहपाठ सांगितला होता, तो पूर्ण केला नाही, म्हणून नाराज होऊन गुरुजी त्याला रागावू लागले. रामचंद्र म्हणाला, "आमच्या नशिबी विद्या असेल, तर मिळेल." त्यावर गुरुजी रागाने टोमणा मारीत म्हणाले की, "ब्राह्मणाचा मुलगा आहेस, गळ्यात जानवे आहे, तेव्हा माधुकरी मिळेल." हे ऐकून रामचंद्राला राग आला. त्याने मागचा पुढचा विचार केला नाही. जानवे तोडून टाकले, लंगोटी काढून टाकली आणि शाळेतून निघून तुळशीबागेत येऊन बसला. तेथे मुलांना घेऊन गुरुजी आले व त्याला उचलून शाळेत घेऊन गेले आणि शिक्षा करून चांगली वर्तणूक करण्याची शपथ त्याच्याकडून घेवविली.

**डॉ. गणपतरावांचे घरी**

बालक रामचंद्राचे सौंदर्य, डोळे व चातुर्य पाहून त्याच्या वडिलांचे दोस्त डॉ. गणपतराव यांनी त्याला आपल्या घरी ठेवून घेतले. ते नाटकाचे शौकीन होते. ते त्याच्या खाण्या-पिण्याची, कपडे-पांघरूण याची फार काळजी घेत होते. त्याला नाटक पाहण्यास घेऊन जात. एके दिवशी ते म्हणाले, "जर तू साडी नेसून, नथ घालून, डोळ्यांत काजळ घालून नाटकात स्त्रीची भूमिका केलीस तर उठून दिसेल." तेव्हा रामचंद्राने ताडकन उत्तर दिले की, "प्रथम खालचे कापून टाकावे लागेल." डॉक्टरांनी त्याला खूप समजविण्याचा प्रयत्न केला. शेवटी त्याला घरी पाठविले.

**त्रिंबकराव किबे यांच्या घरी**

त्रिंबकराव किबे हे रामचंद्राच्या वडिलांचे दोस्त होते. एके दिवशी ते घरी आले. घरातील परिस्थिती पाहून त्यांना सहानुभूती वाटली व ते त्याला शिक्षणासाठी आपल्या घरी घेऊन गेले. मुलाचे लक्ष शिक्षणात नाही, असे त्यांना दिसून आले,



तेव्हा त्यांनी रामचंद्राला बाजारहाटाचे काम सोपविले. तो चांगला व्यवहार करू लागला. शेवटी त्याने घरी परतण्याचा विचार केला तेव्हा किबे यांनी त्याला पन्नास रुपये दिले. घरी आल्यावर तो मोडीचा व्यवहार करू लागला. शहरात फिरून तो जुन्या वस्तू घासाघीस करून विकत घेई व त्या दुकानदारांना विकत असे, परंतु यात फारसा फायदा होत नव्हता म्हणून तो समाधानी नव्हता.

**पंढरपुराची वारी**

दरवर्षी ज्येष्ठ वद्य नवमीला आळंदीहून श्रीज्ञानेश्वर महाराजांची पालखी निघून आषाढ शुद्ध एकादशीला पंढरपुरी जाते. या वारीमध्ये हजारो-लाखो वारकरी भगवंताचे भजन कीर्तन करीत जातात. पालखी आळंदीहून दशमीला पुण्यात येई आणि दुसऱ्या दिवशी पुढे जात असे. रामचंद्राच्या मनात भक्ति-भाव होता. वारीमध्ये सामील होऊन भगवंताचे दर्शन घेण्यासाठी पंढरपुरास जाण्याची इच्छा त्याच्या मनात आली. त्याने आपल्याबरोबर येण्यासाठी काही मुलांचे मन वळविले. रामचंद्राने आपण पंढरपुरास जात असल्याचे आईला सांगितले होते.

एकादशीला पालखी पुढे निघाली. मुले उत्साहाने भजन गात बरोबर चालू लागली. ५-६ मैल पायी चालल्यावर काही मुले थकून गेली आणि घरी परतण्यासाठी हट्ट करू लागली. रामचंद्राने त्यांना समजविण्याचा आणि धीर देण्याचा प्रयत्न केला, परंतु ते घाबरून परत गेले. दोन मुले उरली पण थोडे पुढे गेल्यावर तीसुद्धा थकून गेली. शेवटी रामचंद्राने त्यांना पुण्याकडे जाणाऱ्या एका बैलगाडीत बसवून दिले. तो स्वत:ही थकला होता, परंतु दृढ निश्चयाने एकटा वारीबरोबर निघाला.

वीस मैल चालल्यावर रामचंद्राचे पाय सुजून आले होते. फार वेदना होत होती. त्या लहान मुलाला पाहून एका म्हाताऱ्या वारकरी बाईने त्याच्या पायाला तेल चोळले आणि गरम पाण्याने शेकले. वारीच्या उत्साहात रामचंद्र पंढरपुरास पोहोचला.

**पांडुरंगाचे दर्शन**

पंढरपुरात आषाढी एकादशीला वारकऱ्यांचा सागर उसळला होता. रामचंद्र हा एकटा होता आणि गर्दीत त्याला कोणाचाच आधार नव्हता. ती गर्दी ओलांडून

जायची हिम्मत नव्हती. भगवंताचे दर्शन कसे घडणार ? तो घाबरून रडू लागला. डोळ्यांतून अश्रू वाहू लागले. सर्वजण भगवंताचे दर्शन घेण्यासाठी धावत होते. त्या अनोळखी बालकाकडे कोण पाहणार ?

इतक्यात गुडघ्यापर्यंत धोतर नेसलेला, काळ्या रंगाचा आणि डोक्याला मुंडासे गुंडाळलेला एक धिप्पाड माणूस त्याच्याजवळ आला. त्याने मोठ्या प्रेमाने रामचंद्राला विचारले की, "बाळा, का रडत आहेस ?" तो म्हणाला, "मला भगवंताचे दर्शन घ्यायचे आहे." हे ऐकताच त्या माणसाने गर्दीची पर्वा न करता त्याचा हात धरला आणि ओढत नेऊन भगवंतांच्या चरणी त्याचे मस्तक ठेवले आणि भगवंताच्या गळ्यातील माळ त्याच्या गळ्यात घातली. नंतर त्याला बाहेर आणून सांगितले, "तुला भगवंताचे दर्शन घडले. मी तुझा बडवा आहे, माझे नाव विठ्ठल बडवा असे आहे. तू इतर देवांचे दर्शन घेऊन मला भेट. मी दक्षिण दरवाज्याजवळ आहे." रामचंद्र इतर देवांचे दर्शन घेऊन बाहेर आला व शोधू लागला, तेव्हा तो बडवा भेटला नाही. ही हकिकत ऐकून एक वारकरी म्हणाला, "तू मोठा भाग्यवान आहेस, तुला प्रत्यक्ष विठ्ठलाने दर्शन दिले आहे." त्या माणसाने रामचंद्राला आपल्या घरी नेले. आठ दिवस त्याला प्रेमाने ठेवून घेतले आणि कपडे-पैसे देऊन एका ओळखीच्या वारकऱ्याबरोबर मोठ्या प्रेमाने पुण्याला पाठविले. रामचंद्राची वारी सफळ झाली.

**भगवतीची कृपा**

रामचंद्राला वाटत होते की पुण्यात आपले शिक्षण पूर्ण होत नाही, तेव्हा एखाद्या चांगल्या गावी जाऊन ते पूर्ण करावे. एका मित्राबरोबर तो कसे तरी करून धुळ्याला पोहोचला. परंतु तेथील हायस्कूलमध्ये प्रवेशाचा प्रयत्न जमला नाही. शेवटी ते दोघे निराश होऊन परत निघाले. परतताना त्यांनी नाशिकजवळच्या वणीच्या सप्तशृंगी देवीचे दर्शन घेण्याचा विचार केला. सप्तशृंगी देवी ही उंच डोंगरावर वसली आहे. ते दोघे तेथे पोहोचले. देवीने त्याला स्वप्नात येऊन सांगितले की, "आपल्या या मित्राची संगत सोड. तू परत जा. तुला कोणत्याही गोष्टीची कमतरता पडणार नाही." देवीने त्याच्या मित्राला घाबरे करून परत जाण्यास भाग पाडले.



रामचंद्र हा तेथील संन्याशाजवळ काही दिवस राहिला. भगवती सप्तशृंगी देवीची मूर्ती पुरुषभर उंच व अष्टभुजा आहे. तिचे रूप उग्र आहे व ते मोठे जागृत स्थान आहे. पूजेनंतर तिच्या तोंडात त्रयोदशगुणी विडा ठेवला जातो. एके दिवशी रामचंद्र हा देवीच्यासमोर हात जोडून उभा होता, तेव्हा तो कधीही खाली न पडणारा विडा त्याच्या हातात पडला. पाहणारे पुजारी व भक्त चकित झाले. ते म्हणाले, " तू मोठा भाग्यवान आहेस. देवीने तुला कृपा-प्रसाद दिलेला आहे." रामचंद्राने मोठ्या भक्तिभावाने तो कृपा-प्रसाद घेतला.

* * *

**श्रीरामानंद उवाच**

सत्त्वगुणामुळे मिळणारे सुख आणि तमोगुणामुळे मिळणारे सुख यामध्ये काही फरक नाही. दारूच्या नशेत धुंद माणसामध्ये व गाढ झोपी गेलेल्या माणसामध्ये फरक नाही, परंतु पहिल्यामध्ये अज्ञान आहे आणि दुसऱ्यामध्ये ज्ञान आहे. यात जमीन-अस्मानाचा फरक आहे. तमोगुण हा अज्ञानात परिणत होतो, तर सत्त्वगुण ज्ञानामध्ये. तमोगुण हा अध:पतनास घेऊन जातो, तर सत्त्वगुण मोक्षाच्या दाराकडे पुढे नेतो.

# ३. व्यवसाय व संसार

**घर-प्रपंच**

बळवंतराव बीडकर यांचे निधन झाल्यावर मोठा मुलगा बापू याने घर सोडले होते. रामचंद्र लहान होता. गंगूबाईने मोठ्या धैर्याने घर सांभाळले होते. तिने रामचंद्राला शिकवण्याचा प्रयत्न केला, पण त्यात यश आले नाही. बळवंतरावांच्या मित्रांनी रामचंद्राला आपल्या घरी ठेवून शिकविण्याचा प्रयत्न केला, परंतु शिक्षणात त्याचे लक्ष नव्हते. तो घरी परत आला आणि आपल्या हिंमतीवर काम करून आईला मदत करू लागला. काही वर्षांतच त्याने गंधीचे काम शिकून आपला व्यवसाय सुरू केला. जुन्या वस्तूंची देवाण-घेवाण सुरू होतीच.

**रामचंद्र आता गंधी व सराफ**

पुण्यात आल्यावर रामचंद्र घरची जबाबदारी सांभाळण्याचा प्रयत्न करू लागला. त्याला इंग्रजी येत नव्हते, म्हणून मोठी नोकरी मिळणे शक्य नव्हते. प्रारंभी कोर्टात तो उमेदवारी करू लागला. दिवसाला रुपया मिळायचा. परंतु त्यामुळे त्याला समाधान वाटत नव्हते म्हणून त्याने ते काम सोडून दिले. तो कवड्या व मोड विकू लागला. सोन्या-चांदीची पारख करू लागला, परंतु जवळ भांडवल नसल्यामुळे जास्त पैसे मिळत नव्हते. शेवटी तो एका गंधीच्या दुकानात कामास लागला.

दिवसभर दुकानात काम करताना रामचंद्राने सुगंधी द्रव्याची चांगली माहिती करून घेतली. कच्चा माल कोठून खरेदी करायचा, भट्टी कशी लावायची, यंत्र लावून अत्तर कसे काढायचे, हे सर्व त्याने काही दिवसांतच समजून घेतले. दुकानाचा कारभार तोच पाहात होता. दुकानदाराला काहीही पाहावे लागत नव्हते. तो खूष होऊन रामचंद्राला बक्षीस देत असे.



एवढे कौशल्य मिळाल्यावर रामचंद्राने नोकरी सोडली आणि तो स्वत:च सुगंधी द्रव्ये बनवू लागला. तो आपला माल विकण्यासाठी कल्याण, ठाणे, मुंबई या ठिकाणी जाऊ लागला. आकर्षक व्यक्तिमत्त्व आणि गोड भाषा यामुळे लोकांना तो आवडू लागला. तो देशी व विदेशी अत्तरे यांचे मिश्रण करून उंची अत्तरे बनवू लागला. मोठमोठे साहेब त्याच्याकडून अत्तरे घेऊ लागले. चांगला पैसा मिळू लागला. रामचंद्राला आता लोक गंधी या नावाने ओळखू लागले.

अत्तरांच्या व्यापारात नाव कमावल्यावर तो जुन्या वस्तू देण्या-घेण्याच्या व्यापारात उतरला. त्यातही त्याला यश मिळू लागले.

**खुदा देता है छप्पर फाडकर**

रामचंद्राला जुन्या वस्तू देण्या-घेण्याची आवड होती. एके दिवशी शहरातून हिंडताना त्याला पेशवाईच्या काळातील एका वाड्यात जुन्या भांड्यांचा लिलाव होत असल्याचे दिसले. भांडी काळी पडली होती, परंतु नक्षीकाम केलेली होती. ३० भांडी होती. रामचंद्राने पुढे होऊन १५० रुपयांना ती विकत घेतली.

घरी आणून तो ती वर ठेवू लागला, तेव्हा एक समई खाली पडली आणि वेडी वाकडी झाली. पितळेची असती तर मोडली असती. रामचंद्राने उत्सुकतेने ती स्वच्छ करून पाहिली, तेव्हा सोन्याची असल्याचे दिसून आले. लक्षपूर्वक पाहताना समईच्या पोकळीमध्ये काही भरल्यासारखे वाटले. खोलून पाहिल्यावर त्या पोकळीमधून बहुमूल्य किंमतीची रत्ने बाहेर पडली. 'खुदा देता है तो छप्पर फाड्कर।' पापणी लवताच रामचंद्र मालामाल झाला. लोक आता त्याला रामभाऊ सराफ किंवा भाऊसाहेब गंधी किंवा भाऊसाहेब बीडकर अशा वेगवेगळ्या नावाने ओळखू लागले.

पुष्कळ पैसा मिळाला, परंतु भाऊसाहेब गंधी यांनी गंधीचा धंदा चालू ठेवला, आता ते माल तयार करवून घेऊ लागले. त्यांचे सराफीचे दुकान नव्हते, सराफ बाजारात त्यांची पत निर्माण झाली. रत्न पारखण्याची कला त्यांच्या जवळ होती. बाजारातील लोक रत्नांच्या व्यापारात त्यांचा सल्ला घेऊ लागले. अत्तरे व सुगंधी द्रव्यांच्या व्यापारासाठी ते दूरवर जात होते. श्रीमंत लोक, राजे-रजवाडे आणि इंग्रज अधिकारी हे त्यांचे गिऱ्हाईक होते. ते प्रभावशाली, व्यक्तिमत्त्व संपन्न

होते. त्याशिवाय उंची पोशाख व बोलण्यातील चातुर्य या गोष्टींमुळे ते जेथे जात तेथे त्यांचे स्वागत होई व मागितल्याप्रमाणे दाम मिळत असे.

गंगूबाईने त्याचा विवाह बाविसाव्या वर्षी नगरजवळील देवीचे केडगाव येथील रामजी पाटील यांची मुलगी रंगूबाई हिच्याबरोबर लावून दिला. पुढे त्याना एक मुलगी झाली. उपवर झाल्यावर तिचा विवाह रावेरचे राजे रघुनाथराव देशमुख यांचेबरोबर झाला.

भाऊसाहेब बीडकर यांचे आपल्या आईवर मोठे प्रेम होते. ते आईच्या वचनात होते. घरची परिस्थिती चांगली झाल्यावर त्यांच्या घरी बरेचसे नातेवाईक आश्रय घेऊ लागले. भरलेले घर पाहून त्यांना आनंद वाटे. ते घरातील सर्वांची काळजी घेत. जेव्हा बाहेर गावी जात तेव्हा तेथून चांगल्या वस्तू आणून सर्वांना वाटत असत. दुसऱ्यांना देण्यात आणि खाऊ घालण्यात त्याना समाधान वाटत असे.

काही वर्षानंतर भाऊसाहेबांनी आपल्या मोठ्या भावाला वडोदऱ्याहून शोधून आणले. परंतु काही दिवसानंतर पुन्हा तो घर सोडून बेपत्ता झाला.

* * *

**श्रीरामानंद उवाच**

पोट भरण्यापुरते अन्न आणि चांगली संगत लाभली तर निम्मे काम झाले, असे समजा. मोठ्या भाग्याने तुला देवाची संगती लाभली आहे. त्याची सेवा करीत राहशील तर तुला कोणतीही कमतरता भासणार नाही. देव हा आपल्या मनातच असतो. जेव्हा मन हे विकारांनी मलिन होते, तेव्हा देव दिसत नाही. दुनिया ही देवाण-घेवाणीवर चालते. तू दुसऱ्याचे वाईट चिंतलेस तर तुझ्या पदरी वाईट येते. या जगात जी थोडीशी सेवा घडेल, ती मनःपूर्वक करशील तर ती श्रेष्ठ होय. देव हा भावाचा भुकेला आहे.



# ४. महाठगीण माया

## विलासिता

भाऊसाहेब बीडकर यांची गणना मोठ्या श्रीमंत लोकांत होऊ लागली. त्यांना लक्ष्मीचा वरदहस्त लाभला होता. गंधीचा व्यापार चालला होता. वरच्या थरातील लोकांशी संबंध येत होता. उच्च समाजातील लोकांची संगत व मोठी धनदौलत त्यांना मिळाली होती. मान-सन्मान व प्रसिद्धी लाभली होती. त्यामुळे हळूहळू ते विलासी बनू लागले. ते एका नायकिणीच्या मोहजालात अडकले. नाच-गाण्यावर उधळल्यामुळे पुंजी आटू लागली. आईला हे माहीत होते, परंतु जाणत्या मुलाला काय व कसे सांगणार?

भाऊसाहेबांच्या काही चांगल्या मित्रांनी त्यांना समजावण्याचा खूप प्रयत्न केला, परंतु डोक्यात भिनलेली नशा ही कुणाचे ऐकत नाही. मग लोक त्यांच्यापासून दूर जाऊ लागले. त्यांची बेअब्रू होऊ लागली. धन आणि यौवन यांची घमेंड उतरल्यावर ते शुद्धीवर आले. ठकवणारी माया कसे नाचवेल ते समजत नाही. बापजाद्यांची मनसबदारी मिळविण्यासाठी राजा-महाराजांना भेटावे, ठिकठिकाणी साधु-संत, फकीर, अवलिये आहेत, त्याना भेटून किमया मिळविण्याचा प्रयत्न करावा, असे त्यानी ठरविले. त्यामुळे द्रव्यभाव जाईल. ते नव्याने वर येण्याचा प्रयत्न करू लागले.

## वडोदऱ्याची सफर

भाऊसाहेब बीडकर हे सुगंधी द्रव्ये घेऊन प्रथम वडोदऱ्याला गेले. तेथील महाराजा गायकवाड यांची भेट घ्यायची होती. शहरात फिरून त्यानी माल विकला. महाराजांची भेट घेण्यासाठी ते संस्थानामधील मोठमोठ्या सरदारांना भेटले, भेटीची आशा वाटेना. ते काळजीत पडले. इतक्या लांब येऊनही कार्यभाग साधत नव्हता.

भाऊसाहेब हे जन्मजात बुद्धिवान होते. ज्याज्या वेळी अडचण येई, त्यात्या वेळी त्यांची बुद्धी वेगाने काम करू लागे आणि एखादा उपाय सापडे. त्यानी भाजी मंडईत जाऊन चौकशी केली की शहरात रोज किती पालेभाजी येते. तेथे रोज १०-१५ रुपयांची पालेभाजी येत असे. दलालांना भेटून त्यानी तिन्ही दिवसांची सर्वच्या सर्व पालेभाजी खरेदी करण्याचा सौदा केला. ती सर्व भाजी ते गाईंना खाऊ घालू लागले. दोन दिवस बाजारात भाजी मिळेना. तिसऱ्या दिवशी शहरात चर्चा होऊ लागली की परगावचा कोणी व्यापारी आला आहे आणि तो सर्व भाजी घेऊन गाईंना चारत आहे.

महाराजांनी नोकराला पाठवून त्यांना बोलावून घेतले. भाऊसाहेब उत्कृष्ट पोशाख घालून व अत्तरे लावून भेटायला गेले. महाराजांना त्यांनी वाकून नमस्कार केला. प्रभाव पडला. त्यांनी विचारले की, "तुम्ही कोण, कुठले आणि भाजी खरेदी करून गाईंना का चारता?" भाऊसाहेबांनी उत्तर दिले की, "आम्ही नारो शंकर यांच्या वंशातले. बीडला राहणारे आहोत. महाराजांचे आम्ही पिढीजाद नोकर आहोत. येथे आल्यावर महाराजांची भेट घेण्याची इच्छा होती, परंतु परवानगी मिळेना म्हणून ही युक्ती केली." त्यांचे चातुर्य पाहून महाराज खूष झाले. त्यांनी त्यांच्याजवळचा माल घेण्याचा वायदा केला आणि पहिल्या वर्गाचा शिधा देण्याचा हुकूम केला.

तेथे आरामात एक महिना गेला, परंतु काम काही नव्हते. शेवटी भाऊसाहेब महाराजांना पुन्हा भेटले. त्यांनी त्यांना विनंती केली की आमच्याकडे आपल्या संस्थानची पिढीजाद सनद आहे, म्हणून मनसबदारी मिळावी.

महाराज म्हणाले की, " ही गोष्ट फार जुनी आहे. ते काम आता दुसऱ्याला दिले आहे. पण तुमची इच्छा असेल तर देखरेखीचे काम देऊ. पगार दोनशे रुपये महिना देऊ ! "

तेव्हा भाऊसाहेब म्हणाले की, "सरदार घराण्याचे असताना असे बनियाचे काम करणे योग्य नव्हे. आपला हुकूम असेल तर तलवारबाजीचे पिढीजाद काम मिळावे. आम्ही कर्तृत्व दाखविण्यासाठी तयार आहोत."

महाराज म्हणाले की, "तलवार चालविण्याचे दिवस आता राहिले



नाहीत." म्हणून पाच हजार रुपये देऊन त्याना सन्मानपूर्वक निरोप दिला. मग भाऊसाहेबांनी तेथे ब्राह्मण-भोजन घातले. काही खट्याळ लोकांना हे बरे वाटले नाही. त्यांनी एका वाईट बाईला फूस लावून भाऊसाहेबांना बदनाम करण्याचा प्रयत्न केला, परंतु ते मोठ्या चातुर्याने त्या प्रकरणातून सुखरूप बाहेर पडले.

**ग्वाल्हेरची सफर**

भाऊसाहेब बीडकरांनी पुण्यास आल्यावर ग्वाल्हेरला जाण्याचे ठरविले. त्यानी आपल्याबरोबर उंची अत्तरे व सात पल्ल्या उदबत्त्या घेतल्या. तेथे गेल्यावर ग्वाल्हेरच्या राजाची भेट घेण्याचा प्रयत्न केला. एका अपरिचिताला राजाजवळ कसे जाता येणार? त्यांनी सरदार-दिवाणाकडे फेऱ्या मारल्या, पण यश मिळाले नाही.

तेव्हा त्यानी वडोदऱ्याप्रमाणे येथेही एक युक्ती करण्याचे ठरविले. ग्वाल्हेरच्या राजमहालासमोर गोरखी नावाचे एक मैदान आहे. एके दिवशी भाऊसाहेब पुष्कळशा उदबत्त्या घेऊन मैदानात गेले. त्यानी त्या रचल्या व पेटवून दिल्या. सर्व मैदान सुवासाने दरवळू लागले. हवेमुळे सुगंध राजवाड्यातही पसरला. संपूर्ण राजवाडा दरवळू लागला. चौकशी सुरू झाली तेव्हा समजले की एक परदेशी माणूस मैदानात उदबत्त्या जाळत आहे. त्याला मनाई करायचा हुकूम झाला. नोकराने पळत येऊन भाऊसाहेबांना तसे सांगितले. ते म्हणाले, " आम्ही काही बेकायदेशीर करीत नाही. स्वत:चा माल जाळत आहोत." महाराजाने हे उत्तर ऐकून महाराजांनी त्याना हजर करायचा हुकूम दिला.

भाऊसाहेबांना हेच हवे होते. त्यानी जाऊन महाराजांना अदबीने सलाम केला. चौकशी झाली, "कोण आहात, कोठून आलात? आणि उदबत्त्या का जाळत आहात? " तेव्हा ते म्हणाले, "हुजूर, आपल्या भेटीसाठी हे निमित्त केले. आम्ही बीडचे राहाणारे आहोत आणि बापजाद्यापासून आपले सेवक आहोत. आमच्या पूर्वजांनी आपल्याकडून सनद मिळविली होती. ती मिळावी म्हणून आम्ही विनंती करण्यास आलो आहोत."

सुनावणीपर्यंत महाराजांनी त्याना शिधा देण्याचा व रोज कचेरीत येण्याचा हुकूम दिला. त्यांच्याकडील सर्व माल घेण्याचे वचन दिले.

ग्वाल्हेर हे गाण्या-वाजवण्याच्या बाबतीत प्रसिद्ध आहे. तेथे भाऊसाहेबांनी दोन महिने आरामात काढले. शेवटी एकदा सुनावणी होऊन हुकूम झाला की ही गोष्ट फार जुनी आहे. सनदेप्रमाणे आता तिनशे घोडेस्वाराचा सरदार बनविणे शक्य नाही. हवे असेल तर तुम्हाला तहसिलदारी देता येतील. भाऊसाहेबांनी लेखन-हिशोब याचे काम करण्यास नकार दिला. तेव्हा त्यांना पाच हजार रुपये व एक अलंकार देऊन निरोप देण्यात आला.

यामुळे भाऊसाहेबांवर जळफळणाऱ्या काही लोकांनी कारस्थान केले. त्यानी भाऊसाहेबांना भोजनासाठी बोलावून अफू खाऊ घातली. नशेच्या गुंगीत असताना एक नायकीण त्यांना आपल्या घरी घेऊन गेली. महाराजांकडे तक्रार गेली. भाऊसाहेबांना जाब विचारला तेव्हा ते म्हणाले, "माझी बदनामी करण्यासाठी हे कारस्थान केलेले आहे. परमेश्वराच्या कृपेमुळे आम्ही वाचलो. त्याच कारस्थानी लोकांनी आपल्याकडे तक्रार केली आहे." महाराजांचे समाधान करून भाऊसाहेबांनी त्यांचा निरोप घेतला.

ग्वाल्हेरमध्ये असताना एक बाई भाऊसाहेबांच्यावर भाळली. तेथून निघताना ती म्हणाली की, "आपल्यावर माझे मन बसले आहे. आपण गेल्यावर माझे कसे होणार?" ते म्हणाले, "मग चल आमच्याबरोबर." तिने विचारले, "त्या परदेशात आपण माझ्यापासून दूर झालात तर? त्या देशात आपल्याकडून निराश्रित झाल्यावर माझे कसे होणार?" भाऊसाहेबांनी खात्री देत तिला म्हटले की, "हा आमचा शब्द आहे." शेवटी ती त्यांच्याबरोबर पुण्यास आली. भाऊसाहेबांनी तिला इतमामाने वागविले. शेवटपर्यंत तिला त्यांनी आपल्याजवळ ठेवले आणि आपला शब्द पाळला.

**जयपूरमध्ये**

उत्तर भारतातील प्रवासामध्ये भाऊसाहेब जवळपासचा प्रदेश पाहात असत. साधु-संतांना भेटत असत. एकदा ते जयपूरला गेले. तिथे त्यांच्या पूर्वजांची सनद नव्हती की जमीनजुमला नव्हता. पण ते तेथील महाराजांना भेटले. महाराजांनी विचारले, "तुम्ही कोणते ब्राह्मण आहात?" त्यांनी चटकन उत्तर दिले की, "पेटिया ब्राह्मण." कुणालाच काही उलगडा झाला नाही. विचारले तर दरबारचे नाव



जाईल म्हणून रोज दोन रुपयांचा शिधा देण्याचा हुकूम झाला. मग त्यांनी दोन दिवस आरामात शहर पाहाण्यात घालविले. एके दिवशी ते निरोप घेण्यास महाराजांकडे गेले. तेव्हा त्यांनी विचारले की, "पेटिया ब्राह्मण म्हणजे काय?" भाऊसाहेबांनी उत्तर दिले की, "पोटार्थी !" ऐकून सर्वजण हसू लागले. त्यांचा हजरजबाबीपणा पाहून महाराज खूष झाले व त्यांनी आदर-सत्कार करून निरोप त्याना दिला.

**साताऱ्याला**

असेच एकदा ते सातारला गेले. तेथे ते सातारच्या तत्कालीन राजमाता आईसाहेबांना भेटले. त्यांनी चौकशी केली की, "कोण आहात? कुठले आहात?" यांनी सांगितले की, "आम्ही सरदार घराण्याचे ब्राह्मण आहोत. हल्ली गंध्याचा व्यवसाय करतो." आईसाहेब म्हणाल्या की, "ब्राह्मण असून असा धंदा करावा काय?" भाऊसाहेबांनी सांगितले की, "हातून तलवारी गेल्या आणि बाटल्या व डबडी आली. काय करायचे? " आईसाहेब हसून म्हणाल्या की, "आता आम्ही राजे नाही, आपला सन्मान कसा करणार?" तेव्हा भाऊसाहेबांनी आदर दाखवीत म्हटले की, "आम्ही आपणास लक्ष्मीचा अवतार समजतो." राजमातेने मग शाल-पागोटे देऊन त्यांचा सत्कार केला व त्यांच्याकडून मालही खरेदी केला.

**जंजिऱ्याला भेट**

भाऊसाहेब जंजिऱ्याच्या सुलतानाच्या दरबारातही गेले. तेथे बराच माल खपला. जंजिऱ्याला एक मांत्रिक स्त्री होती. भाऊसाहेब तिला भेटले. ती मोकळ्या भांड्यातून हळद व आपल्या पदरातून खडीसाखर काढून वाटत असे. तिने भाऊसाहेबांना खडीसाखर काढून दिली. विचारल्यावर तिने सांगितले की मंत्राच्या शक्तीने असे घडते.

* * *

# ५. आजवर नासले, आता नाही

**परमार्थास योग्य बनण्याची प्रतिज्ञा**

भाऊसाहेब हे अनेक ठिकाणी व्यापाराच्या निमित्ताने गेले. तेथील राजे-रजवाडे यांना भेटले. मोठ्या लोकांच्या ओळखी झाल्या. पैसा पुष्कळ मिळाला, पण इकडे नाच-गाणे हेही चालू राहिले, म्हणून गाठीला पैसा राहात नव्हता. पैशाची कमतरता भासतच होती. खूप पैसा मिळावा म्हणून ते साधु-संत, फकीर, अवलिया यांना भेटून त्यांची कृपा मिळविण्याचा प्रयत्न करू लागले. कल्याणमध्ये त्याना एक अवलिया भेटला. त्याची सेवा करून त्यानी त्याच्याकडून किमया (सोने बनविण्याची कला) मिळविली. किमयेमुळे खूप पैसा मिळाला, पण तोही उडून जात राहिला. भरपूर पैसा मिळविण्याचा लोभ त्याना वाटत होता. काम आणि दाम यांची वासना कधी तृप्त होते काय? ते साधु-संतांचे दर्शन घेत होते. त्यांच्या उपदेशाचा परिणाम काही होत नव्हता.

त्यांची ही स्थिती पाहून एका साधूने सर्वांसमक्ष त्यांची हजेरी घेतली. “वैराग्याशिवाय सर्व खोटे आहे. तुम्ही चैनी करीत राहा. परमार्थ ही तुमच्या हातची गोष्ट नाही.” साधूचे हे शब्द भाऊसाहेबांना लागले. ते अस्वस्थ झाले. त्याच क्षणी त्यानी प्रतिज्ञा केली की मी यांच्याकडून परमार्थास योग्य असल्याचे म्हणवून घेईन.

प्रतिज्ञा केली, पण विषयासक्ती आपल्याकडे ओढून घेत होती. तिच्या तावडीतून बाहेर पडणे हे सोपे होते काय? हट्टाने मनात विरक्ती आणण्याचा प्रयत्न केला, परंतु तो व्यर्थ ठरत होता. इकडे प्रतिज्ञाही व्यर्थ ठरत होती. शेवटी त्यानी आपली प्रतिज्ञा अमलात आणण्याचा दृढ निश्चय केला आणि ते आपले आराध्य दैवत असलेल्या मारुतीची उपासना रात्रंदिवस करू लागले. या उपासनेमुळे त्याना आत्मबल मिळू लागले. एके दिवशी त्याना स्वप्नात मारुतीचा दृष्टांत झाला की, “अक्कलकोटस्वामींच्या दर्शनाला जा.”



**गुरू-दर्शनाची ओढ**

ते मोठ्या आवडीने अक्कलकोटला गेले. श्रीस्वामी समर्थांच्या भेटीसाठी मन तळमळू लागले होते. तेथे गेल्यावर त्यानी प्रतिज्ञा केली की जोपर्यंत श्रीस्वामींचे दर्शन होत नाही, तोपर्यंत अन्न-ग्रहण करणार नाही.

लोकांनी सांगितले की, “तुमची प्रतिज्ञा काही पूर्ण होणार नाही. स्वामी नुकतेच राजवाड्यात गेले आहेत. एकदा तेथे गेल्यावर ते पंधरा-पंधरा दिवस बाहेर पडत नाहीत आणि त्यांचे दर्शन घडत नाही. तेव्हा ही प्रतिज्ञा तुम्ही सोडून द्या.” परंतु भाऊसाहेबांना वाकण्याचे कधी ठाऊक नव्हते. प्रतिज्ञा पूर्ण करायचीच या निश्चयाने ते अन्नत्याग करून सद्गुरूंचे स्मरण करीत बसून राहिले.

इकडे राजवाड्यात श्रीस्वामी महाराज आरडा-ओरड करू लागले. ओरडत म्हणू लागले की, “आम्हाला बंदीखान्यात टाकता काय? लोकांना त्रास सहन करावा लागतो. त्याना दर्शन घडत नाही.” जवळच्या लोकांवर ते शिव्यांचा भडिमार करू लागले. लोक त्याना अडविण्याचा प्रयत्न करू लागले, पण कुणाचेही न ऐकता ते वाड्याच्या तटावरून उडी मारून बाहेर आले.

**सद्गुरूने घेतला वेध**

ही बातमी कळताच भाऊसाहेब बीडकर स्नान करून व पूजेचे साहित्य घेऊन श्रीस्वामींच्याकडे गेले. अत्यंत भक्तिभावाने पूजा करून त्यानी स्वामींच्या चरणी मस्तक ठेवले. श्रीस्वामींनी विचारले, “पाया का पडतोस?” उत्तर दिले, “पाया मजबूत हवा.” तेव्हा त्यानी बोट उचलून खुंटीवर टांगलेले मृगाजिन दाखवीत म्हटले, “ते बघ, ते बघ.” भाऊसाहेबांनी विनम्रपणे सांगितले की, “अज्ञानी आहे.” मग काय, शिव्यांचा भडिमार सुरू झाला. जवळची मंडळी घाबरून गेली. आता संकट कोसळणार असे वाटू लागले. तेथे श्रीस्वामींचे शिष्य चोळाप्पा व सुंदराबाई या बसल्या होत्या. त्यानी भाऊसाहेबांना म्हटले, “ तुम्ही गृहस्थ आहात. श्रीस्वामींचा राग कोसळला तर अनर्थ घडेल.” परंतु ते स्वामींच्यासमोरून न हटता, तेथेच खंबीरपणे उभे राहिले. शेवटी श्रीस्वामी शांत झाले. ते म्हणाले, “आता येथून निघून जा. तुझे काम झाले.” त्यांचा कृपा-

प्रसाद मिळाल्यावर भाऊसाहेब पुण्यास परतले.

श्रीसद्‌गुरूंनी नेम धरून वेधले होते. आता ते रामभाऊ गंधी किंवा भाऊसाहेब बीडकर उरले नाहीत. ते गुरु-भक्तीमुळे वेडे होऊन गेले. वाणी मौन झाली. प्रापंचिक गोष्टी ऐकायला कान उरले नाहीत. आता त्यांचे कान हे जगाच्या गोष्टी ऐकत नव्हते. इकडे तिकडे भिरभिर चालणारे पाय कुंठित झाले. जिभेवर निरंतर सद्‌गुरु -माऊलीचा जप होऊ लागला. एक वर्ष जपामध्ये मग्न होऊन राहिल्यावर ते माघी पौर्णिमेला सद्‌गुरूच्या दर्शनासाठी अक्कलकोटला पोहोचले. त्यांना पाहिल्यावर श्रीस्वामी म्हणाले, "आंबा पाडाला आला आहे. पिकल्यावर काम होईल.'' सद्‌गुरूंची आज्ञा झाल्यावर ते परत आले आणि गुरु-स्मरणात गुंग झाले.

एक वर्षानंतर पुढल्या माघी पौर्णिमेला ते अक्कलकोटला गेले. या वेळी त्यानी सद्‌गुरूंचा उपदेश होईपर्यंत तेथेच सेवा करीत राहण्याचे ठरविले. ते रात्रीच्या वेळी सद्‌गुरूंचे पाय चेपीत असत. एका रात्री श्रीस्वामींच्या गुडघ्यातून एक भयंकर नाग फूत्कार करीत प्रकट झाला. भाऊसाहेब बीडकर यांनी स्वत:ला गुरूंच्या चरणी अर्पण केले होते. सद्‌गुरू मारो अगर तारो. त्यानी स्वामींचे पाय सोडले नाहीत. तेव्हा ते उठून बसले आणि संतापून म्हणाले, "तू मोठा राक्षस आहेस, जिन्न आहेस." भाऊसाहेब बीडकरांना एक क्षण असे वाटले की आता सद्‌गुरू शाप तर देणार नाहीत? इतक्यात त्यांचा राग शांत झाला. ते म्हणाले, "जिन्न राक्षसा, इथून चालता हो." आणि त्यानी त्यांच्या थोबाडीत मारली. थोबाडीत पडताच श्रीबीडकर बेशुद्ध होऊन पडले. कुणीतरी त्याना दुसऱ्या खोलीत नेऊन ठेवले.

सकाळी जेव्हा ते जागे झाले, तेव्हा आनंदामध्ये बुडून गेले होते. थोबाडीत मिळाल्यावर त्यांची अहंता पूर्णपणे नाहीशी झाली होती. आता श्रीबीडकर हे बीडकर उरले नाहीत. त्यांचा नवा जन्म झाला होता. श्रीस्वामी समर्थांचे शिष्योत्तम श्रीरामनंद बीडकर महाराज म्हणून लोक त्यांना ओळखू लागले.

**मागे-पुढे गुरू उभे**

नंतर श्रीबीडकर महाराज स्वामींच्या दर्शनाला गेले तेव्हा स्वामी म्हणाले,



"आता तुझ्या बापाचे काय देणे उरले आहे? जा, सेवा कर." श्रीस्वामींनी त्यांना सहस्रभोजन घालण्याची आज्ञा केली. गुरूने दिलेली सहस्रभोजनाची आज्ञा कशी पुरी व्हायची? जवळ इतके पैसे नव्हते. बरोबर त्यांनी अत्तरे आणली होती, परंतु अक्कलकोट रोड स्टेशनावरून घोड्यावर बसून येताना, घोडा दचकला आणि अत्तरांची पेटी खाली पडून कुप्या फुटल्या. आता काय करणार?

तेव्हा त्यानी अक्कलकोटच्या दिवाणांच्या ओळखीवर माल उधार घेतला व सहस्रभोजन घातले. सर्वांना चार-चार आणे दक्षिणा दिली. श्रीस्वामी महाराज म्हणाले, "आम्हाला भोजन दिलेस, दक्षिणा दिली नाहीस, बच्चा दच्छिना देगा, बहुत देगा." श्रीबीडकर महाराजांना वाटले की श्रीस्वामी दक्षिणेसाठी मोठी रक्कम मागतील. काही हरकत नाही. ते म्हणाले, "आपली आज्ञा शिरसावंद्य." परंतु स्वामींना ते पटले नाही. ते म्हणाले, "आता खोटे का बोलतोस? तुमसे दक्षिणा दी नहीं जाएगी। वचन दो।" श्रीबीडकर महाराजांनी हातावर हात ठेवून तीन वेळा वचन दिले, तेव्हा श्रीस्वामी समर्थ म्हणाले, "तू जी जडी-बुटींची किमया करतोस, ती आजपासून बंद. पुढे करायची नाही. हीच आमची गुरु-दक्षिणा. "

ज्या किमयेमुळे जीवन चांगले चालले होते, जिचा मोठा आधार होता, तीच बंद झाली तर कसे होणार? दुसरा कुणी असता तर त्याने मागे-पुढे पाहिले असते, परंतु श्रीबीडकर महाराज यांची गुरु-निष्ठा अढळ होती. काहीही विचार न करता ते म्हणाले, "आपली आज्ञा शिरसावंद्य आहे, परंतु मी स्वत: किमया करणार नाही. त्यासाठी शिष्याला तयार करीन." तेव्हा श्रीस्वामी म्हणाले, "करणारा मिळाला तर कर." श्रीबीडकर महाराज म्हणाले, "परमार्थ विद्यासुद्धा मी दुसऱ्यांना सांगेन." स्वामी म्हणाले, "राम्या, भुकेल्याला खाऊ घाल, नाहीतर अन्नाचा चिवडा होईल." त्यावर श्रीबीडकर महाराज म्हणाले, "भुकेल्याला कुणीही खायला देईल."

अनुग्रह आता पूर्ण झाला होता. अक्कलकोटमधील उधारी भागवायची होती. किमया तर गुरूंच्या चरणी अर्पण केली होती. पैसा कुठून येणार? राजवाड्यात अष्टगंध वगैरे चोळून स्वामी समर्थांना स्नान घालत असत, परंतु योगायोगाने तेच संपले होते. दिवाणांनी राजेसाहेबांना बीडकरांचे नाव सुचविले.

श्रीबीडकर महाराजांना विचारल्यावर ते म्हणाले, "माझ्याकडे कस्तुरी नाही. ती मिळाली तर बनवून देईन." कस्तुरीची व्यवस्था झाली. मग श्रीबीडकर महाराजांनी फुटलेल्या कुप्यांतून फाया घालून अत्तराचे थेंब काढले आणि ते मिसळून उत्कृष्ट अष्टगंध तयार केले. राजेसाहेबांना ते आवडले. मागितली ती किंमत मिळाली. उधारी भागवून वाटचालीसाठी पैसेही उरले. गुरूच्या चरणी स्वत:ला अर्पण केल्यावर तोच सर्व अडचणीतून निभावून नेतो. मग काळजी कशाची ?

श्रीस्वामींची कृपा झाल्यावर श्रीबीडकर महाराज पुण्यास परतले. सद्गुरु-स्मरणाशिवाय त्यांना चैन पडत नसे. आता त्याना संसाराविषयी विरक्ती आली. आसक्ती सुटली व मनात विरक्ती आली. या दरम्यान त्यांची आई कैलासवासी झाली. बेपत्ता झालेला भाऊ निवर्तल्याचे समजले. बहिणी वारल्या होत्या. ममतेची बंधने एक एक अशी तुटू लागली होती. परंतु अजुनी कर्तव्ये सांभाळावयाची होती. ग्वाल्हेरच्या बाईला शेवटपर्यंत सांभाळायचे वचन दिले होते. तीही लवकरच वारली. श्रीमहाराजांच्या मनावरचे एक ओझे उतरले.

ते व्यावहारिक दृष्टीने उदासीन होऊ लागले होते. लोक त्यांची चेष्टा करू लागले की भाऊसाहेबांना वेड लागले आहे. गुरूने वेधल्यावर वेडे कसे होणार नाहीत ? काही लोक निंदा करू लागले की करून-करून भागले आणि आता देवपूजेला लागले. परंतु श्रीमहाराजांना स्तुतीचा आनंद वाटत नव्हता व निंदेमुळे त्रास होत नव्हता. एक सद्गुरूच आता तारणारा होता. काही दिवसानंतर ते गुरूंच्या दर्शनासाठी अक्कलकोटला गेले, तेव्हा श्रीस्वामी म्हणाले की, "पुन्हा येथे येऊ नकोस. नर्मदा-परिक्रमा कर."

श्रीबीडकर महाराजांनी शिष्याकरवी किमया करण्याचा प्रयत्न केला, परंतु तो यशस्वी झाला नाही, तेव्हा त्यानी तो विचार सोडून दिला. उत्पन्नाचे साधन नाहीसे झाले. घरात जे नातेवाईक येऊन राहिले ते ओढग्रस्ती पाहून निघून गेले. आता घरात फक्त दोघेजण होते, एक स्वत: श्रीमहाराज व सौ. जानकीबाई आईसाहेब. श्रीमहाराजांच्या मनात आता एकच विचार होता की गुरूंच्या आज्ञेप्रमाणे नर्मदा-परिक्रमा करायची आहे. कुणालाही न सांगता नि:संग बनून जाण्याच्या संधीची वाट पाहात होते.



त्यांची मुलगी गरोदर होती. बाळंतपणात तिची काळजी घेण्यासाठी रावेरीहून जावयांचे बोलावणे आले. सौ. जानकीबाई आईसाहेब तेथे जाऊन तीन महिने राहणार होत्या. त्याना पोहोचविण्याच्या निमित्ताने रावेरीला जाऊन तेथून परिक्रमेसाठी निघून जायचे महाराजांनी ठरविले. त्यांनी आईसाहेबांना रावेरीला पोहोचविले व पुण्याला जाऊन येतो, असे सांगून ते रावेरी स्टेशनवर आले. परंतु गाडीत न बसता ओंकारेश्वरला पायी निघाले. ओंकारेश्वरहून परिक्रमेसाठी निघण्याचा त्यानी विचार केला होता.

त्यानी संकल्प केला होता की आजवर नासले आता नासणार नाही. या जीवनाची आजपर्यंत नासाडी केली, आता त्याची नासाडी होऊ देणार नाही. वाटेल ते होवो.

* * *

### श्रीरामानंद उवाच

पैशासाठी साधन करणे योग्य नव्हे. सिद्धी या वारांगनेप्रमाणे असतात. त्या क्षणिक सुख देऊन निघून जातात. पुण्य-क्षेत्री राहून अशी कुकर्मे करण्यामध्ये आत्मनाश आहे. मंत्रसिद्धी ही मिळविता येते, परंतु योग-सिद्धी भगवंतांच्या कृपेमुळे प्राप्त होते.

✻

स्व-स्वरूपाची जोपर्यंत आवड निर्माण होणार नाही, तोपर्यंत अहंता व ममता सुटणार नाही. जारण-मारण ही विद्या नरकाला पोहोचविते. कनक व कांता यांचा लोभ हा परमार्थाला बाधक असतो.

# ६. सांगण्या पलीकडची गोष्ट

**नर्मदा-परिक्रमा**

श्रीबीडकर महाराज नर्मदातटी ओंकारेश्वरला पोहोचले. तेथे एक सत्प्रवृत्त ब्रह्मचारी साधक राहात होते. त्यांच्या आश्रमात श्रीमहाराज उतरले. त्यांना श्रीमहाराजांनी आपला नर्मदा-परिक्रमेचा संकल्प सांगितला. आपल्याजवळील कपडे, जोडे इत्यादी वस्तू त्यांच्याकडे देऊन श्रीमहाराज म्हणाले की, "जर आम्ही जिवंत परत आलो, तर या वस्तू परत द्या." ब्रह्मचारीबुवांनी महाराजांना परिक्रमेचे नियम सांगितले. नर्मदेचा काठ सोडायचा नाही, दिवसातून एकदा तरी नर्मदेचे पाणी प्यायचे. त्यांनी हेही सांगितले की, "वाटेत एका टेकडीवर एक गोसावी राहातो. तो कुणालाही थारा देत नाही. त्याच्याकडे जाऊ नका. पुढे गेल्यावर फत्तरगीर गोसावी याचा मठ आहे. तो घमेंडखोर आहे. ब्राह्मणांचे जानवे तोडून टाकतो व त्यांचा अपमान करतो म्हणून त्याच्याकडेही जाऊ नका." श्रीमहाराज त्यांचा निरोप घेऊन अनवाणी निघाले. त्यांच्याजवळ नेसण्यासाठी एक धोतर व खांद्यावर एक पंचा अशा दोनच गोष्टी होत्या.

**टेकडीवरचा गोसावी**

ब्रह्मचारीबुवानी सांगितले होते की टेकडीवर राहणाऱ्या गोसाव्यापासून व फत्तरगीर गोसाव्यापासून दूर राहा. परंतु श्रीमहाराजांना पाहावयाचे होते की त्यांच्यात किती दम आहे, म्हणून जाणून बुजून ते टेकडीवरच्या गोसाव्याच्या पर्णकुटीवर गेले. तेथे कोणी नव्हते म्हणून जोरजोराने हाका मारू लागले. तेव्हा तो संतापून शिव्या देत दगड घेऊन मारायला धावला. त्याची झोपमोड झाली होती, म्हणून वाईट बोलत होता. श्रीमहाराज गप्प उभे होते. गोसाव्याने रागावून त्यांना निघून जायला सांगितले.

तेव्हा श्रीमहाराज नम्रपणाने म्हणाले की, "मी ब्रह्मप्राप्तीसाठी परिक्रमा



करीत आहे. तुमच्यासारखा गुरू मिळाल्यास मी शिष्य होण्यास तयार आहे." तेव्हा तो म्हणाला, "चेला बनायचे असेल तर नुसत्या गप्पा मारून उपयोगी नाही. तन-मन-धन सर्व काही गुरूला अर्पण करावे लागते, गुरूची सेवा करावी लागते. अनेक जन्माचे हे काम आहे." मग तो श्रीमहाराजांना घाबरवून सोडण्यासाठी उपदेशांच्या लंब्या-चवड्या गोष्टी सांगू लागला. तरीही श्रीमहाराज विचलित झाले नाहीत. त्यांनी सेवा करण्याची इच्छा व्यक्त केली. दुपारचे कडक ऊन पडले होते. गोसाव्याने श्रीमहाराजांच्या खाण्या-पिण्याचा विचार न करता एक मोठी घागर आणून त्यांच्यासमोर ठेवली आणि नर्मदेचे पाणी आणण्यास फर्मावले. श्रीमहाराज हे दृढ निश्चयी व शब्द पाळणारे होते. ते दोन दिवसांचे उपाशी-तापाशी होते. मागचा पुढचा विचार न करता ते घागर उचलून नदीकडे निघाले. दुपारच्या तापलेल्या रेतीमध्ये पाय पोळून निघत होते. पळतपळत ते पाण्याजवळ पोहोचले आणि त्यांनी पाण्यात उडी घेतली. आंघोळ करून पाणी प्यायल्यावर त्याना बरे वाटले. पाण्याने भरून घागर खांद्यावर घेतली. परतताना पाय रेतीत रुतू लागले आणि भाजू लागले. परंतु सद्‌गुरूंचे स्मरण करीत ते घाईघाईने परतू लागले. त्याना अशक्तपणा व उन्हामुळे चक्कर आली आणि घागर खाली पडून फुटून गेली. तरीही मोठ्या धैर्याने ते सद्‌गुरूंचे स्मरण करीत एका झाडाखाली जाऊन बसले.

तिकडे त्या गोसाव्याच्या नित्य पूजेमध्ये जी गोपाळकृष्णाची मूर्ती होती ती थरथर कापू लागली. ते पाहून गोसावी घाबरून गेला. मूर्तीमधून आवाज येऊ लागला की, "मला पाणी आणण्यास सांगतोस काय ?" प्रत्यक्ष आपले आराध्य असलेल्या गोपाळकृष्णाचे बोलणे ऐकून तो गोसावी पश्चात्ताप करू लागला आणि क्षमा मागून श्रीमहाराजांना शोधायला निघाला. त्या गोसाव्याला येताना पाहून श्रीमहाराजांना वाटले की आता हा तापट गोसावी काय करतोय कुणास ठाऊक, म्हणून ते सद्‌गुरूंचे नामस्मरण करीत बसून राहिले. गोसाव्याने येऊन श्रीमहाराजांचे पाय धरले व तो क्षमा मागू लागला. त्याने महाराजांना सर्व गोष्टी सांगितल्या आणि तो त्याना आपल्या कुटीमध्ये घेऊन आला.

श्रीमहाराजांना घेऊन आल्यावर गोसाव्याने त्यांच्या खाण्या-पिण्याची व्यवस्था केली व शिष्य बनून त्यांची सेवा करू लागला. तो गोसावी काही दुष्ट

नव्हता. भगवंताचा मोठा भक्त होता. रात्री तो पायात घुंगरू बांधून मोठ्या प्रेमाने भगवंतासमोर नाचत असे. गोपाळकृष्णाची मूर्ती सगुण साकार होऊन त्याच्यासमवेत, हसत-नाचत असे. आपल्या आराध्याला प्रसन्न करण्यासाठी तो रात्री खूप उशिरापर्यंत नाचत असे, म्हणून त्याला दुपारी झोप येत असे. हे रहस्य कुणाला माहीत होऊ नये म्हणून तो कुणाला आपल्याजवळ फिरकू देत नसे. कुणी आले तर शिव्या देऊन पिटाळत असे.

त्याचे भगवत्प्रेम पाहून श्रीमहाराजांना आनंद झाला. त्यांनी चार-पाच दिवस तेथे राहून त्याला ध्यानयोगाचे ज्ञान दिले. सगुण-निर्गुण यातील भेद सांगितला आणि प्राणिमात्राबद्दल दयाभाव बाळगणे, अतिथीचा सत्कार करणे इत्यादी गोष्टींचा उपदेश करून त्याचा निरोप घेतला. गोसावीसुद्धा त्यांचा भक्त बनला.

**फत्तरगीर बाबा**

श्रीबीडकर महाराज हे एकट्याने परिक्रमा करीत असत. इतर परिक्रमावासींच्याबरोबर चालणे त्याना आवडत नसे. त्या लोकात त्याना "राघव चैतन्य" या नावाने ओळखले जात होते. त्यांची कीर्ती फत्तरगीर बाबाने ऐकली. तो योगी होता, परंतु त्याला अजुनी पूर्णावस्था प्राप्त झालेली नव्हती. तो आपल्या गुरूच्या समाधीजवळ थाटामाटाने राहात असे. त्याचे सद्गुरू पूर्ण योगी होते. ते समाधिस्थ झाले होते. त्यानी बाबाला सांगून ठेवले होते की माझ्या समाधीवर जो कोणी समाधी लावेल, त्याला तू माझ्यासारखा योगी समज. त्या बाबाने आपल्या गुरूची संगमरवरी समाधी बनविली होती आणि तिच्या पूजेसाठी ब्राह्मण ठेवला होता.

त्याला गांजा पिण्याचा शौक होता. त्याची चिलीम फार मोठी होती. चिलीम घेऊन तो असा दम मारायचा की मोठी ज्वाळा निघत असे. कुणी आला तर त्याला चिलीम देऊन त्याची फजिती करून गम्मत पाही. ती चिलीम ओढल्यावर सामान्य माणसाची नशेमुळे दुर्दशा होत असे. तो ब्राह्मणांना तुच्छ समजत असे व नशा चढल्यावर त्यांचे जानवे तोडून टाकीत असे. श्रीमहाराज आल्यावर त्याने त्यांची फजिती करावयाचे ठरविले आणि शिष्याकडून चिलीम तयार करून त्यांच्या



हाती दिली. प्रवासामुळे श्रीमहाराज दमून गेले होते, परंतु त्यानी न डगमगता चिलीम घेतली आणि जोरदार दम मारला, त्याबरोबर चिलमीतून ज्वाळा निघाली. ते पाहून बाबाने शाबासकी दिली आणि त्याना आपल्याबरोबर झोपाळ्यावर बसविले, मान दिला.

श्रीमहाराजांनी दोन-चार दिवस तेथे राहून पाहिले की फत्तरगीर बाबा हा मठ, शिष्य, ऐषआराम व अहंकार यांच्या मायाजाळात गुरफटून गेला आहे. योगी असूनही भोगी झालेला आहे. तेव्हा त्यानी त्याच्या गुरूच्या समाधिमंदिरातच स्वत: समाधी लावण्याचे ठरविले. त्यानी तिथल्या ब्राह्मण पुजाऱ्याला सांगितले, पण तो बाबाच्या भीतीमुळे घाबरून गेला. श्रीमहाराजांनी त्याला समजावले, आणि समाधीच्या स्थानी प्रवेश केला व ते त्या ठिकाणी समाधी लावून बसले. कुणाला पत्ता लागला नाही. श्रीमहाराज दिसले नाहीत म्हणून फत्तरगीर बाबा अस्वस्थ झाला. श्रीमहाराजांबरोबर खाता-पिताना, चिलीम ओढताना त्याला आनंद वाटे. दुसऱ्या दिवशी श्रीमहाराजांनी बाबाच्या स्वप्नात येऊन सांगितले की मी समाधिमंदिरात समाधी लावून बसलो आहे. बाबाने समाधिमंदिराचे दार उघडून पाहिले तर श्रीमहाराज समाधिमग्न होते. त्याना पाहून बाबाला मोठा आनंद झाला. त्याच्या गुरूने सांगितले होते की माझ्या समाधीमध्ये जो कोणी समाधी लावून बसेल, त्याला तू माझ्यासारखा समज. बाबाला प्रत्यक्ष सद्गुरूची भेट झाल्याचा आनंद झाला. त्याचा सर्व अहंकार नाहीसा झाला व त्याने श्रीमहाराजांचे चरणी लोटांगण घातले.

त्या बाबाने मोठ्या आदराने श्रीमहाराजांना आपल्याजवळ ठेवून घेतले. त्याने योग-मार्गातील आपल्या अडचणी त्याना सांगितल्या. श्रीमहाराजांनी त्याचे समाधान केले. ते म्हणाले की, "तपस्येमुळे सिद्धी मिळतात, परंतु त्या योग्याला भुरळ पाडतात व ठकवितात. मनातील आसक्ती गेल्याशिवाय योगाची सिद्धी होत नाही, म्हणून तू अहंकार सोडून देऊन स्वरूपाचे अनुसंधान कर." सच्च्या योग्याकडून उपदेश मिळाल्यामुळे बाबाला खूप आनंद झाला. त्याला आपल्या कृत्याबद्दल पश्चात्ताप वाटू लागला. श्रीमहाराजांनी समाधीच्या पूजेसाठी असणाऱ्या ब्राह्मण शिष्यालाही उपदेश दिला की येथे गुंतून न पडता ध्यान-मार्गाचा स्वीकार कर. मग ते परिक्रमेसाठी पुढे निघाले.

## सद्गुरूंचे दर्शन

श्रीमहाराज कधी परिक्रमा करणाऱ्यांबरोबर जात, तर कधी एकटे जात असत. एकदा ते इतरांना सोडून एकटेच निघाले. आठ दिवस काही खाल्ले नव्हते. ते घनदाट जंगलातून निघाले. सूर्य मावळला होता आणि अंधार उतरू लागला होता, तेव्हा त्याना जाणीव झाली की समोरचा कडा तुटलेला आहे आणि जवळजवळ चाळीस फूट खाली एक छोटी नदी नर्मदेला येऊन मिळत आहे. इकडे; तिकडे पाहिले तर घनदाट झाडी होती. मागे किंवा पुढे जाण्यास रस्ता नव्हता. रात्रीच्या अंधारात हिंस्र पशू बाहेर येतील. त्याना बळी तर पडणार नाही? सद्गुरूंचे स्मरण करून श्रीमहाराजांनी तेथील एक शिळा स्वच्छ करून घेतली. सफाई करताना अचानक एक लोखंडाचा तुकडा सापडला. ही सद्गुरूंची कृपा समजून त्यानी सद्गुरूंना प्रणिपात केला. तो तुकडा दगडावर घासून साफ केला आणि गारगोटीने ठिणगी पाडून आग तयार केली. ऊब मिळाल्यामुळे बरे वाटले. शेकोटी-जवळ बसून ते ध्यान करू लागले. अर्ध्या रात्री सावध झाले तेव्हा त्याना दिसले की शेकोटीच्या पलीकडे कोणी तरी बसलेले आहे. पाला-पाचोळा घालून आग पेटविली तर समोर एक धिप्पाड वाघ बसला होता. तो दिसताच श्रीमहाराज फार घाबरून गेले, परंतु क्षणभरात त्यानी स्वत:ला सावरले. विचलित न होता त्यानी पवन स्थिर केला आणि वाघाच्या पाठीवर नजर रोखली. एवढ्यात वाघाने तोंड वळविले. रात्रीच्या अंधारात त्याची डरकाळी ऐकून ते घाबरले, परंतु हट्टाने त्यांनी त्याच्या नजरेला नजर भिडविली. तो बिचकला. गर्जना करीत व शेपूट आपटीत तो फिरू लागला. असे वाटत होते की आता तो कधीही श्रीमहाराजांवर तुटून पडेल. शेवटी तो डरकाळ्या फोडत शेकोटीपासून दूर उडी मारून नजरेआड निघून गेला. सद्गुरूंची ही दया पाहून श्रीमहाराजांच्या डोळ्यात अश्रू तरळले. तहान-भूक लागली होती. परंतु कोणताच आधार नव्हता. सद्गुरूंचे चिंतन करीत त्याना केव्हा झोप लागली, हे कळले नाही.

सकाळी जेव्हा डोळा उघडला तेव्हा काहीशी हुशारी वाटत होती. तेथील कडा तुटलेला होता. तहान खूप लागली होती. कड्याखाली नदीची वाळू होती. सद्गुरूंचे स्मरण करीत त्यानी वाळूत उडी मारली. मऊ वाळूमुळे त्याना काही



लागले नाही. त्यानी मनसोक्त पाणी पिऊन घेतले. आता वर कसे जायचे? शेवटी ते नदीच्या काठाने चालू लागले. झाडी ओलांडून गेल्यावर त्याना दिसले की वाळूत दुप्पट आकाराची लांब-रूंद पावले उमटली आहेत. जवळपास कोणी मनुष्य राहात असावा, असे वाटले. त्या पाऊलखुणांचा मागोवा घेत ते चालू लागले. एकदम त्याना आपण एका गुहेच्या तोंडाशी उभे असल्याचे आढळून आले. गुहा चिंचोळी होती व आत अंधार पसरलेला होता. मोठ्या धैर्याने ते आत शिरले. थोडासा प्रकाश दिसू लागला आणि पुढे गेल्यावर ते मोकळ्या जागेत पोहोचले. तेथे एक आश्रम होता. आश्रमाच्या दारावर तोच रात्रीचा वाघ डोळे मिटून बसला होता. ही सद्गुरूंची लीला आहे, हे त्यानी जाणले. त्यानी त्या वाघाच्या चरणी लोळण घेतली, तेव्हा त्याना दिसले की प्रत्यक्ष श्रीस्वामी समर्थ तेथे विराजमान आहेत. श्रीमहाराजांनी त्यांचे पाय धरले आणि ते आनंदाश्रूंनी श्रीस्वामींचे चरण प्रक्षालन करू लागले. श्रीस्वामी समर्थ त्यांची पाठ थोपटत म्हणाले, "बेटा, भिण्याचे काही कारण नाही." आणि ते अदृश्य झाले. सद्गुरूंच्या दर्शनामुळे श्रीमहाराज निश्चिंत झाले आणि पुढे जाऊ लागले. दूरवर पसरलेली दाट झाडी, फुलांनी डवरलेल्या वेली आणि कड्यामधील पाषाणातून टपकणारे पाणी पाहून श्रीमहाराजांचा आनंद गगनात मावेना. त्यानी चोहीकडे शोध घेतला तर कड्यातील छोट्या गुहेत एक धिप्पाड योगिराज बसल्याचे दिसले. त्या महान योग्याचे दर्शन झाल्यावर त्यानी त्यांची स्तुती करीत त्याना साष्टांग नमस्कार केला. त्याना पाहून योगिराजांनी विचारले की, "तू येथे का व कसा आलास?" श्रीमहाराज म्हणाले की, "आपल्या प्रेरणेमुळे मी आपल्या पाऊलखुणांचा मागोवा घेत येथे आलो." योगिराज प्रसन्न झाले. त्यानी श्रीमहाराजांना ध्यानयोगाने "अहं ब्रह्मास्मि" हा दृढ भाव प्राप्त करण्याचा उपदेश दिला. श्रीमहाराज म्हणाले, "शरीराच्या विकारांवर विजय मिळविण्यासाठी मन वश केले पाहिजे." हे ऐकून योगिराजांना समाधान वाटले. त्यानी आश्रमाच्या परिसरात लागलेला एक कंद श्रीमहाराजांकडून भाजून घेतला. त्याचे टरफल काढल्यावर त्यातून शिऱ्यासारखी चव असलेला गर बाहेर पडला. तो खाल्ल्यावर श्रीमहाराजांना आठ दिवस भुकेचा त्रास वाटला नाही.

योगिराजांनी त्याना तीन-चार दिवस आपल्याजवळ ठेवून घेतले. मग

म्हणाले, "येथे तुझी नर्मदा-परिक्रमा पूर्ण झाली आहे, आता तू परत जा." त्यानी श्रीमहाराजांना डोळे मिटून घेण्यास सांगितले आणि एका क्षणात मोठ्या रस्त्यावर आणून सोडले. योगिराजांचा निरोप घेऊन ते पुढे जाऊ लागले.

**साने स्वामी**

पुढे गेल्यावर साने स्वामींचा मठ होता. ते संन्यासी होते. वैद्यकीची चांगली माहिती त्याना होती. लांब लांबून लोक त्यांच्याजवळ औषधोपचारासाठी येत असत. औषधोपचाराच्या कामातून मोकळे झाल्यावर बदाम व खसखस दुधात वाटून उबटन बनविले जाई, शिष्य त्यांच्या अंगाला ते चोळूनचोळून लावत व गरम पाण्याने स्नान घालीत. ते स्वामी एकांतामध्ये शाळिग्रामाची पूजा करीत असत. पूजेनंतर कफनी व खडावा घालून माधुकरी मागून आणीत. परत आल्यावर ती माधुकरी मठातील गाईंना चारल्यानंतर ते भोजन करीत असत.

श्रीमहाराज तेथे पोहोचले तेव्हा साने स्वामी एकांतात होते. शिष्यांनी आग्रह केल्यामुळे श्रीमहाराज तेथे थांबले. भोजनानंतर स्वामी आपला मोठेपणा सांगू लागले. आपण योगी आणि दानी असल्याचे वर्णन करू लागले. दोन दिवस राहिल्यावर श्रीमहाराजांना कळून आले की स्वामी आपल्या शरीराचे चोचले पुरवीत आहेत. तिसऱ्या दिवशी स्वामी श्रीमहाराजांना नर्मदेच्या किनारी घेऊन गेले. शौचादीनंतर श्रीमहाराजांनी डोहात आंघोळ केली. मात्र स्वामी नदीत आंघोळ करण्यास मागे पुढे पाहू लागले. तेव्हा श्रीमहाराज त्याना म्हणाले की, "संन्यास घेऊन भगवी वस्त्रे घातल्याने काही होत नाही. मनोनिग्रह नसेल तर संन्यासापेक्षा गृहस्थाश्रम चांगला." स्वामी नाराज होऊन म्हणाले, "तुम्हाला डोहात उडी मारायला सांगितले तर बोलणे बंद होईल." हे ऐकताच श्रीमहाराजांनी मगरींनी भरलेल्या त्या वीस-पंचवीस हात खोल डोहात उडी घेतली. स्वामी घाबरले. आता ब्रह्महत्येचे पाप लागेल, या विचाराने ते काळजीत पडले. श्रीमहाराज खूप वेळ बाहेर आले नाहीत, म्हणून स्वामी आपल्या शिष्यांना बोलावण्यास मठाकडे धावले. तोपर्यंत श्रीमहाराज पाण्यातून बाहेर आले. स्वामींचे डोळे उघडले. ते त्यांची स्तुती करीत म्हणाले, "आपण महान आहात. माझी देह-ममता सुटण्यासाठीच भगवंताने आपणास पाठविले होते." स्वामींनी खऱ्या अर्थाने संन्यस्त



राहण्याचा दृढ निश्चय केला. श्रीमहाराज दोन दिवस तिथे राहून पुढे निघाले.

**त्रिशूलपाणीच्या वनात**

पुढे एका गोसाव्याचा मठ होता. श्रीमहाराज तेथे गेले. गोसाव्याने त्यांचे आदरातिथ्य केले. त्याने सांगितले की, "पुढे त्रिशूलपाणी या ठिकाणी घनदाट वन आहे. तिथे रस्ते, पाऊल-वाटा नाहीत. कातळाचा प्रदेश आहे आणि जागोजागी कडे तुटलेले आहेत. तेथे यात्रेकरू वाट चुकून भरकटत जातो. तिथे जायचे म्हणजे मृत्युमुखी जाण्यासारखे आहे. या गोष्टींची माहिती यात्रेकरूंना देण्यासाठीच मी येथे मठ बनवून राहात आहे." श्रीमहाराजांनी त्याचे आभार मानले. अधिक तपास केला, तेव्हा तो म्हणाला की, या त्रिशूलपाणीमध्ये त्रिशूलपाणी भगवान शंकरांचा निवास आहे. एकदा शंकर हे पार्वतीबरोबर विलास करीत होते, तेव्हा अचानक परिक्रमा करणारे लोक तेथे आल्याचे पाहून ती लाजली. तिने शाप दिला की, "या वनामध्ये जो प्रवेश करील तो जिवंत परत येणार नाही." मग भगवान शंकरांनी उःशाप दिला की, "जो योगी असेल तोच येथून पलीकडे जाऊ शकेल, किंवा भक्तिभावाने जो मला शरण येईल त्याला मी मदत करीन." श्रीमहाराजांनी त्या गोसाव्याचा निरोप घेतला आणि त्या त्रिशूलपाणीच्या वनात जायचे ठरविले.

झाडीमध्ये प्रवेश करताच भिल्लांनी त्याना वेढले आणि आपला कर मागितला. त्यांच्याजवळ होते तरी काय? शेवटी त्यांच्या खांद्यावरचा पंचा घेऊन ते निघून गेले. आता श्रीमहाराजांच्याजवळ नेसायचा पंचा तेवढा राहिला. त्या स्थितीतही ते पुढे निघाले. त्या वनात फळेही नव्हती. दोन दिवस फक्त पाणी पिऊन काढावे लागले. टोकदार दगड धोंड्यांनी भरलेल्या वाटेवरून जाताना त्यांच्या पायाला जखमा झाल्या व रक्त वाहू लागले. तरीही दृढ निश्चयाने ते पुढे जात राहिले. संध्याकाळपर्यंत चालून गेल्यावर त्यांचे पाय सुजून आले. पुढे पाऊल टाकवेना. चक्कर येऊन ते खाली पडले. झोपही येत नव्हती. यौगिक क्रियेने दुःख विसरण्याचा प्रयत्न केला, परंतु त्याचाही परिणाम झाला नाही. त्या अवस्थेत ते रात्रभर तळमळत राहिले.

**नर्मदा मातेची कृपा**

सूर्य उगवला, परंतु थकवा व वेदना यामुळे चालणे कठीण होते. श्रीमहाराज

सद्गुरू श्रीस्वामी समर्थांचा धावा करीत होते. अशा वेळी एक गवळण पाटी घेऊन तेथे आली. तिने पेलाभर दूध त्याना दिले व म्हटले, "महाराज, हे दूध घ्या." श्रीमहाराज म्हणाले, "मैया, तुम्ही तसदी का घेतली? आमच्यासाठी नर्मदेचे पाणी हेच दूध होय." परंतु तिच्या आग्रहाखातर त्यानी ते दूध घेतले आणि एका क्षणात ती अदृश्य झाली. तिला पाहण्यासाठी श्रीमहाराज उठून उभे राहिले तर तहान-भूक भागली होती व शरीरातील वेदना नाहीशा झाल्या होत्या. पायातील जखमासुद्धा भरून आल्या होत्या. ती गवळण म्हणजे नर्मदा माताच होती, हे त्यानी जाणले. सद्गुरू व नर्मदा मातेची कृपा पाहून त्यांच्या डोळ्यात पाणी आले.

**खड्गधारी योगी**

पुढे जाताच अचानकपणे एक योगी खड्ग उचलून श्रीमहाराजांच्यासमोर उभा राहिला आणि युद्धासाठी ललकारू लागला. ते म्हणाले, "आम्हाला काही युद्ध करायचे नाही आणि मिळवायचेही नाही." तेव्हा त्या योगाने त्याना पुढे जाण्यास रोखले आणि मारण्यासाठी तलवार उचलली, परंतु त्याचा हात वरच्यावर राहिला. "माझी तलवार निरुपयोगी ठरली," असे म्हणत त्याने श्रीमहाराजांच्या चरणी लोळण घेतली. चौकशी केल्यावर त्याने सांगितले की, "मी गुर्जर देशातील ब्राह्मण आहे. गुरूची प्रदीर्घ सेवा करीत मी योग-साधना केली, परंतु सिद्धींच्यामागे लागून मी उन्मत्त झालो आणि गुरूंना शरण गेलो, तेव्हा त्यानी सांगितले की, त्रिशूलपाणीच्या वनात ही तलवार घेऊन राहा. ज्या सत्पुरुषाच्या दर्शनाने तुझी तलवार निरुपयोगी होईल; त्याच्या कृपेमुळे तुझी उन्नती होईल. आज आपल्या दर्शनाने माझे काम झाले. मी उपकृत आहे. वाटेत तुम्हाला कोणताही त्रास होणार नाही किंवा भय वाटणार नाही" आणि तो श्रीमहाराजांना वंदन करून निघून गेला.

**योगी विठ्ठल यांची भेट**

पुढे गेल्यावर श्रीमहाराजांना योगी विठ्ठल चैतन्य हे भेटले. पाहताच त्यानी श्रीमहाराजांना मिठी मारली आणि दोन दिवस आपल्याजवळ ठेवून घेतले. त्यानी श्रीमहाराजांना भूक भागविण्याचे कंद दिले. ते योगी पुरुष नेहमी वनात फिरत असत आणि परिक्रमावासीयाना मदत करीत. तसेच त्यांचे रक्षण करीत असत. त्यानी श्रीमहाराजांना पुढची वाट दाखविली आणि शीतोष्ण सहन



करण्यासाठी यौगिक क्रिया सांगितली. त्यानी श्रीमहाराजांना सांगितले की, "येथेच परिक्रमा पूर्ण करा. घरी न सांगताच यात्रा करणे, हे योग्य नव्हे." परंतु श्रीमहाराज म्हणाले की, " मी गुरूंच्या आज्ञेने परिक्रमा करीत आहे. ही अर्धवट सोडून कसा परत जाऊ?" ते त्या योग्याचा निरोप घेऊन पुढे निघाले.

**गांजाकस गोसावी**

परिक्रमेतील यात्रेकरूंच्या सोईसाठी श्रीमंत लोकानी त्रिशूलपाणीनंतर खडावा, पादत्राणे, वस्त्र, लोकरीचे कपडे, छत्र्या इत्यादी देण्याची व्यवस्था केली आहे. सर्वच यात्रेकरू तिचा लाभ घेतात, परंतु श्रीमहाराजांनी कोणतीही वस्तू स्वीकारली नाही. एका श्रीमंताने त्यांच्या पाया पडून विनवणी केली, तेव्हा त्यानी खडावा व तुंबा घेतला. खडावा ते खांद्यावर लटकवीत व तुंबा हातात असे. ते निःस्पृह असल्याची वार्ता सर्वत्र पसरली. योगायोगाने त्या दिवशी त्या श्रीमंत माणसाला व्यापारात दुप्पट फायदा झाला. ते ऐकून अनेक यात्रेकरू श्रीमहाराजांच्या मागे लागले. श्रीमहाराज प्रसिद्धीच्या उपाधीपासून दूर राहू इच्छित होते; म्हणून ते रातोरात तेथून गुपचुपपणे पुढे गेले आणि भडोचमधील नर्मदेच्या पलीकडील तीरावर पोहोचले. अज्ञात बनून एका वृक्षाखाली त्यानी रात्र काढली. श्रीमंत लोक त्याना शोधत तेथे पोहोचले. पाहतापाहता तेथे जत्रा उसळली आणि फळे, मेवा-मिठाई यांचा ढीग पडला. श्रीमहाराजांनी तो सर्वांना वाटून टाकला. त्यामुळे इतर गोसावी चडफडू लागले. ते सर्वजण मिळून श्रीमहाराजांना सतावण्यासाठी तेथे येऊन ठेपले. त्यानी ओढण्यासाठी गांज्याची मागणी केली. श्रीमहाराजांचेजवळ तर काहीही नव्हते. ते गोसावी त्यांची निंदा करू लागले. पैसे मागू लागले. श्रीमहाराज म्हणाले, "माझ्याजवळ काहीही नाही. या खडावा व तुंबा आहे. हवे तर घेऊन जा." एका गोसाव्याने तुंबा उलटा केला, तेव्हा त्याच्यातून गांजा पडू लागला. त्या लोकांनी हवा तितका गांजा घेऊन श्रीमहाराजांचा जयजयकार केला, परंतु श्रीमहाराजांना सिद्धीचा उपयोग करून घेतल्याबद्दल वाईट वाटले. भडोच शहरात त्यांची कीर्ती पसरली आणि दर्शनासाठी गर्दी होऊ लागली.

**रोग स्वीकारला**

एक गुजराथी ब्राह्मण मूळव्याधीने आजारी होता. पाण्याप्रमाणे पैसा खर्च

केला. पण काहीही फायदा झाला नाही. शेवटी त्याने विचार केला की आपण आपला देह नर्मदेत विसर्जित करावा. त्याने आईला व बायकोला खोटेच सांगितले की नर्मदेत स्नान केल्यास रोग जाईल, असे स्वप्न मला पडले. तेव्हा त्या त्याला घेऊन भडोचला आल्या. भडोचमध्ये एक सिद्धपुरुष आल्याचे त्यानी ऐकले व ते सर्वजण श्रीमहाराजांचेपाशी आले. त्या ब्राह्मणाने त्यांचे चरण धरून म्हटले की, "मूळव्याधीमुळे माझे प्राण जायला लागले आहेत. कृपा करून माझा उद्धार करा किंवा मरण द्या. मी आता आत्महत्त्या करू इच्छितो." आणि तो माश्याप्रमाणे तळमळू लागला. त्याच्याबरोबरच्या स्त्रिया रडू लागल्या. श्रीमहाराज म्हणाले की, "ब्रह्मदेवही कुणाचे आयुष्य वाढवू किंवा कमी करू शकत नाही. प्रारब्ध हे भोगावेच लागते. आत्महत्त्या करूनही प्रारब्ध चुकविता येत नाही. आत्महत्त्येचे पाप पुन्हा भोगावेच लागते. म्हणून भगवंताला शरण जा. दुसरा कोणताही उपाय नाही." मग अश्रू ढाळत तो म्हणाला की, "साधुपुरुष हा भगवंतापेक्षा मोठा असतो. मी आपल्याला शरण आलो आहे. आपण मला वाचवा " त्याची विनवणी ऐकून श्रीमहाराज द्रवित झाले. परंतु सिद्धीचा उपयोग करून पुण्य घालविण्यापेक्षा त्यानी त्याचा रोग स्वत:च स्वीकारला. दोन दिवसात तो ब्राह्मण बरा होऊन परत गेला आणि त्या रोगाने श्रीमहाराजांना पछाडले. तो रोग त्याना शेवटपर्यंत तळमळायला लावीत राहिला. अशा उपाधी मागे लागू नयेत म्हणून सद्गुरूंना विनवीत ते तेथून निघाले.

## अजगरापासून वाचले

श्रीमहाराज हे नर्मदेच्या दुसऱ्या तटावरून परत जाऊ लागले. त्रिशूलपाणीच्या पलीकडच्या तीरावर तशीच दाट झाडी होती. भगवंताचे नामस्मरण करीत ते पुढे जाऊ लागले. एके दिवशी सूर्य मावळला होता. त्या वेळी त्याना असे वाटू लागले की कोणीतरी त्याना ओढत आहे. अगदी इच्छा नसताना ते त्याच्याकडे ओढले जात आहेत, असे वाटले. इतक्यात एक भिल्ल आला आणि त्याने त्यांचा हात धरून बाजूला नेले. त्याची भाषा समजत नव्हती. शेवटी त्याने बोटाने तेथील प्रचंड अजगर दाखविला. त्याच्याच श्वासाने श्रीमहाराज त्याच्या तोंडात ओढले जात होते, त्या भिल्लाने त्याना वाचविले.



## कनक-कांतेचा मोह

त्यानंतर रात्रभर चालून श्रीमहाराज एका गावाच्या पाणवठ्यावर पोहोचले आणि विश्रांतीसाठी एका झाडाखाली बसले. गावातील लोक तेथे येऊन या अनोळखी पुरुषाला कुतुहलाने पाहू लागले. इतक्यात दोन स्त्रिया तेथे आल्या आणि त्याना पाहून कुजबुजू लागल्या. त्यातील एकीने हात नाचवत माती हातात घेतली व त्यांच्याकडे फुंकली. कार्यभाग साधला नाही, तेव्हा त्या लज्जित होऊन निघून गेल्या. थोड्या वेळाने एक म्हातारा गृहस्थ आला. त्याने श्रीमहाराजांची चौकशी केली. त्याने सांगितले की, "हा दहा मैलाचा प्रदेश मोठा बदनाम आहे. येथील स्त्रिया मांत्रिक आहेत. त्या परिक्रमा करणाऱ्यांवर जादू-टोणा करून त्याला वश करून घेतात. तेव्हा येथे न थांबता आपण पुढे जा. यातच भलाई आहे." त्याने एक दिवस आपल्या आश्रमात राहण्याचा आग्रह केला, परंतु श्रीमहाराजांनी तो मान्य केला नाही.

तो म्हातारा निघून गेला. थोड्या वेळाने तलम वस्त्र नेसलेली व यौवनाने बहरलेली एक सुंदर तरुणी आपल्या मैत्रिणींबरोबर तेथे आली. तिने फळे आणि फुले त्याना अर्पण करायची इच्छा दाखविली, परंतु महाराजांनी ती स्वीकारली नाहीत. तेव्हा ती म्हणाली की, "आपल्यासारख्या परिक्रमावासीचा आतिथ्य-सत्कार करणे हे आमचे कर्तव्य आहे. माझ्या दोन मैत्रिणी आपणाला मोहित करून माझ्याकडे घेऊन येण्यासाठी आल्या होत्या, परंतु त्यांचे काही चालले नाही. यावरून आपली श्रेष्ठता कळून येते. आमची फार मोठी संपत्ती आहे. आम्ही आपल्याला मठ-मंदिर बनवून देऊ. सेवेसाठी नोकर असतील. आमचा मठ फार संपन्न आहे. मला भाऊ नाही, त्यामुळे माझ्याशी लग्न करून आपण संपन्न महंत बनू शकाल." परंतु श्रीमहाराजांनी नम्रपणे सांगितले की, "आपली बायको सोडून इतर सर्व स्त्रिया मला आई-बहिणीप्रमाणे आहेत." त्यांचे बोलणे ऐकून त्या सुंदरीने लोटांगण घातले. ती म्हणाली, "आज सकाळी आपल्यापाशी आले होते ते माझे पिता होते. नर्मदेच्या प्रेरणेने आपली परीक्षा घेण्यासाठी त्यानी मला पाठविले होते. आपण खरे साधू आहात." तिने क्षमा-याचना करून त्यांची पूजा केली व प्रसाद घेऊन निघून गेली. नर्मदा मातेची ही लीला पाहून श्रीमहाराजांनी तिला दंडवत घातला आणि सद्गुरूंचे श्रद्धेने स्मरण केले.

दुसऱ्या दिवशी तो म्हातारा मठपती श्रीमहाराजांच्यापाशी आला. त्याने त्यांची प्रशंसा करीत उपदेश मागितला तेव्हा श्रीमहाराजांनी त्याला समजावून सांगितले की, "स्व-स्वरूपाची जोपर्यंत आवड निर्माण होणार नाही, तोपर्यंत अहंता व ममता सुटणार नाही. जारण-मारण ही विद्या नरकाला पोहोचविते. कनक व कांता यांचा लोभ हा परमार्थाला बाधक असतो." इतके सांगितल्यावर ते परिक्रमेसाठी पुढे निघाले.

**शतधारा**

पुढे शतधारा नावाचे रमणीय स्थान आहे. तेथे नर्मदा नदी उंच कड्यावरून अनेक प्रवाहानी खाली पडते, म्हणून त्याला शतधारा असे म्हणतात. तेथे मोठा डोह आहे आणि त्यात चंद्रशेखर, गौरीशंकर, कपूरेश्वर, गंगाधर, नागेश्वर इत्यादी नावाने ओळखले जाणारे बाण मिळतात. पैसे घेऊन बाण काढून देणारे पाणबुडे असतात. तेथे एक गरीब वेडासा शिवभक्त ब्राह्मण चंद्रशेखर नावाचा बाण मिळावा, म्हणून हट्ट धरून बसला होता. तेथे आलेल्या लोकांकडून पैसे मागून ते तो चंद्रशेखर बाण मिळविण्यासाठी पाणबुड्याना देत असे, परंतु तो बाण काही त्याला कधी मिळाला नाही. तो सारखा "चंद्रशेखर चंद्रशेखर" घोकत असे, म्हणून लोक त्याला चंद्रशेखर असे म्हणू लागले. श्रीमहाराज जेव्हा तेथे पोहोचले तेव्हा त्याने याचना केली. त्याचा तो भोळा भक्तिभाव पाहून श्रीमहाराजांनी विचारले, "किती चंद्रशेखर हवेत?" त्याने फक्त एक मागितला; तेव्हा लगेच त्यानी डोहात उडी घेतली आणि ओंजळभर चंद्रशेखर बाण घेऊन ते वर आले. त्यापैकी एक त्या गरीब ब्राह्मणाने घेतला. श्रीमहाराजांनी उरलेले बाण डोहात टाकून दिले आणि ते पुढे गेले. त्यांची ही लीला सर्व लोक पाहतच राहिले.

**कनौजी ब्राह्मण तपस्विनी**

श्रीमहाराज पुढील मुक्कामाला जाऊन एका धर्मशाळेत उतरले. इतक्यात मळकट कफनी घातलेली जटाजूटधारी अशी एक ब्राह्मण तपस्विनी त्यांच्याजवळ येऊन अनुग्रह मिळण्याविषयी प्रार्थना करू लागली. ती तरुणपणीच विधवा झाली होती आणि तिला मूलबाळ काही नव्हते. ती कनौजी ब्राह्मण स्त्री घरदार सोडून नि:संग बनून महेश्वराजवळ तपस्या करीत राहू लागली. ती तळहाती भिक्षा व



वृक्षातळी निवास हे व्रत घेऊन, भगवान शिवाचे चिंतन करीत पिंपळाच्या वृक्षाखाली २४ वर्षे तपस्येला बसली होती. तिला स्वप्नात येऊन शिवाने सांगितले की, "तुझी तपस्या सफळ झाली. मी उद्या दुपारी त्या अमुक धर्मशाळेत येणार आहे. तिथे तू माझे दर्शन घे." ती ब्राह्मणी दृष्टांताप्रमाणे धर्मशाळेत येऊन श्रीमहाराजांना विनवू करू लागली, आणि तिचा अधिकार पाहून त्यांनी तिला अनुग्रह दिला. ती कृतकृत्य बनून निघून गेली.

**सद्गुरूंची अवतार समाप्ती**

या दरम्यान श्रीमहाराजांचे सद्गुरू श्रीस्वामी समर्थ महाराज यानी अक्कलकोट येथे समाधी घेतल्याची वार्ता समजली. ही वार्ता समजल्यावर श्रीमहाराजांना अत्यंत दु:ख झाले. त्यांची ममतामयी गुरुमाउली कायमची दूर झाली. सद्गुरूंचा महिमा अनंत असतो. त्यानी कृपाळूपणे अनंत उपकार करून श्रीमहाराजांना आपलेसे केले होते. स्व-स्वरूप पाहण्याची अनंत दृष्टी त्यानी दिली आणि अनंत अशा परमात्म्याचे दर्शन घडविले. गुरुमाउलीशिवाय कोण सोयरा असणार बरे? श्रीमहाराजांचे नेत्र वाहू लागले. ते दु:खात बुडून गेले. विमनस्क झाले. त्याच रात्री स्वप्नात येऊन सद्गुरूंनी सांगितले की, "मी शरीराचा त्याग केला आहे, परंतु मी जिवंत आहे. ओंकारेश्वरला तू आपली परिक्रमा पूर्ण कर." श्रीमहाराजांना वाटत होते की सद्गुरुराज आम्हाला अनाथ करून निघून गेले, परंतु या स्वप्नामुळे त्याना सद्गुरूंची कृपा-छाया अनुभवास आली.

**पंथा येथील मठामध्ये**

श्रीमहाराज परिक्रमेसाठी पुढे निघाले. ३-४ दिवस चालल्यानंतर ते ओंकारेश्वरजवळील पंथा येथे पोहोचले. तेथे एका सिद्धपुरुषाचे स्थान होते. तेथील मठपती मोठ्या आदराने श्रीमहाराजांना मठात घेऊन आला. तो एकटाच त्या मठात राहात होता. मठात एक चबुतरा होता. तो मठपती रोज चबुतरा शेणाने सारवून स्वच्छ ठेवत होता. त्यासमोर रांगोळी काढत होता. नंतर चबुतऱ्यावर व्याघ्रांबर घालून जवळ धुनी लावून ठेवत होता. त्या मठपतीने श्रीमहाराजांना सांगितले की "हे स्थान प्राचीन आहे. येथे कोणी अनधिकारी व्यक्ती बसू शकत नाही. बसला तर संकटे कोसळतात." श्रीमहाराजांनी तेथे बसण्याची इच्छा

दाखविली, तेव्हा मठपती म्हणाला की, "काही झाल्यास मला काही करता येणार नाही." श्रीमहाराज तेथे आसन घालून बसले. दोन दिवस ते ध्यानस्थ बसले होते. त्याना फार आनंद झाला. मठपतीला त्यामुळे समाधान वाटले आणि त्याने गुरू मानून त्यांची पूजा केली व तो सेवा करू लागला. अनेक माणसे श्रीमहाराजांच्या दर्शनासाठी येऊ लागली, नवस करू लागली. श्रीमहाराजांच्यामुळे त्या मठाला बरकत आली. जवळजवळ सहा महिने ते तेथे राहिले, परंतु त्या उपाधीपासून मुक्त होण्याचे त्यानी ठरविले आणि एके दिवशी गुपचुपपणे तेथून निघाले.

**ओंकारेश्वरमध्ये**

ओंकारेश्वरला नर्मदा नदी पार करायची होती. नौकेत बसण्यासाठी श्रीमहाराजांजवळ पैसे कुठे होते? नावाडी पैसे दिल्याशिवाय नावेत चढू द्यायला तयार नव्हता. तेव्हा श्रीमहाराज नदीत उतरून निघाले. मग त्या नावाड्याने त्याना नावेत बसवून घेतले. नौकेतील एका माणसाने ओळखले की राघव चैतन्य या नावाने प्रसिद्ध असलेले हेच साधू होत. तेव्हा लोक जयजयकार करू लागले. एका भक्ताने त्यांची पूजा केली. श्रीमहाराजांनी सांगितल्याप्रमाणे त्याने दक्षिणा नर्मदेला अर्पण केली.

**जानकीदासबाबांची ओसरी**

ओंकारश्वरानजिक नर्मदा-कावेरी संगमाजवळ ऋणमुक्तेश्वराचे प्राचीन मंदिर आहे. मंदिरालगत जानकीदास बाबांची ओसरी आहे. श्रीमहाराजांना माहीत होते की जानकीदास बाबांच्या ओसरीत पाच फण्यांचा व सात फण्यांचा असे दोन नाग राहात आहेत. ते कुणालाही ओसरीत थांबू देत नसत. म्हणून श्रीमहाराजांनी तेथेच राहायचे ठरविले, आणि ते तेथे गेले. ओसरीमध्ये कचरा भरला होता. एक पुजारी येऊन तेथील कोपऱ्यातील दिवा लावून जायचा. त्याने श्रीमहाराजांना तेथे न राहण्याची विनंती केली, परंतु श्रीमहाराजांचा निश्चय पाहून ती ओसरी साफ करून दिली. दुसऱ्या दिवशी संध्याकाळी श्रीमहाराज ओसरीत बसले होते, एवढ्यात पाच फण्यांच्या नागाने येऊन यांच्या पायाला विळखा घातला आणि फूत्कार करू लागला. श्रीमहाराज त्याला म्हणाले, "जसा आलास तसा निघून जा." मग तो नाग गप्प निघून गेला.

श्रीमहाराज पंथाच्या मठातून चुपचाप निघून आले होते. संध्याकाळपर्यंत



ते परत आले नाहीत, तेव्हा तेथील मठपती त्याना शोधायला निघाला. त्याने श्रीमहाराजांचा महिमा लोकांना सांगितला. दोन-तीन गोसावीसुद्धा त्यांची ख्याती ऐकून तेथे आले. परंतु श्रीमहाराजांना सिद्ध-पुरुष समजून खायला प्यायला मिळेल, या आशेने तेथे भुक्कड गोसावी जमले होते; ते त्यांच्याबद्दल वाईट बोलत ओरडू लागले. मठपती काळजीत पडला. तो वारंवार आत जाऊन पाहात होता, परंतु श्रीमहाराज झोपलेले होते. तो त्यांची प्रार्थना करीत बसून राहिला. दयार्द्र होऊन श्रीमहाराजांनी डोळे उघडले. मठपतीला त्यानी कारण विचारले; तेव्हा त्याने सर्व परिस्थिती सांगितली. ते म्हणाले, "संकटे जशी न बोलाविता येतात, तशी ती निघून जातात, म्हणून सर्व भार परमेश्वरावर सोपवावा. मग तो जे योग्य असेल ते करतो." आणि ते डोळ्यावर पांघरूण घेऊन झोपले. गर्दीतील लोक उतावळे झाले होते आणि मोठ्या आशेने ओसरीकडे पाहात होते.

इतक्यात श्रीमहाराजांच्या छातीवर कसली तरी वस्तू येऊन पडली. त्यानी पाहिले की एक अनिंद्य सुंदरी उभी आहे आणि संपूर्ण ओसरी प्रकाशाने उजळून निघाली आहे. ती देवी म्हणाली की, "यात्रेकरूंना खायला घाल." आणि ती पाहतापाहता विजेप्रमाणे ओसरीतून बाहेर येऊन नाहीशी झाली. श्रीमहाराजांनी इकडेतिकडे पाहिले तर एका कोपऱ्यात सोन्याचे कडे पडले होते. त्या गर्दीमध्ये काही पुण्यवान लोक होते, त्याना देवीचे दर्शन झाले आणि ते "नर्मदा माता की जय" म्हणत जयजयकार करू लागले. हा चमत्कार पाहून लोकाना श्रीमहाराजांचे मोठेपण समजले. काही जणानी त्या ओसरीत येऊन त्यांच्या चरणांवर लोटांगण घातले. त्या सुवर्ण कंकणाने महाप्रसाद झाला. यात्रेकरूंना समाधान वाटले. श्रीमहाराजांना वाटले की आता माझी परिक्रमा पूर्ण झाली.

**श्रीमहाराजांचा शोध**

श्रीमहाराज कुणालाही न सांगता रावेरहून नर्मदा-परिक्रमेसाठी निघून गेले होते. पुण्याहून काही पत्र आले नाही म्हणून सौ. जानकीबाई आईसाहेबांना काळजी वाटू लागली. त्यानी पुण्याच्या पत्त्यावर पत्र लिहिले. परंतु उत्तर आले नाही. तेव्हा त्या घाबरून पुण्याला आल्या. श्रीमहाराजांचा पत्ता नव्हता. रावेरच्या व्याह्यानी तपास केला तेव्हा कळले की ते ओंकारेश्वरला गेले आहेत. तेव्हा आईसाहेब एका ब्राह्मणाला व एका नोकराला घेऊन ओंकारेश्वरला गेल्या. चौकशी

केल्यावर पत्ता लागला नाही. तेव्हा त्या अन्न-जल सोडून ओंकारेश्वराच्या मंदिरात तीन दिवस बसल्या. तिसऱ्या दिवशी एका स्वामींनी येऊन त्यांची चौकशी केली, तेव्हा ओळख पटल्यावर स्वामींनी जाणले की आपल्याजवळ वस्तू ठेवून गेलेले स्वामी हेच असावेत. त्यानी आईसाहेबांना आपल्याजवळच्या वस्तू दाखविल्या. त्यांचा पोशाख, जोडे आणि छत्री पाहून आईसाहेबांनी ओळखले. त्या वस्तू पाहून त्या दु:ख करू लागल्या.

त्या स्वामींनी आईसाहेबांना समजावून सांगून धीर दिला. तेव्हा त्यानी परिक्रमेचा मार्ग विचारून घेतला आणि महाराजांचा शोध घेण्यासाठी सोबत दिलेले ब्राह्मण व नोकर याना घेऊन त्या निघाला. त्या जाऊन टेकडीवरच्या गोसाव्याला भेटल्या. त्याच्याकडून माहिती मिळाल्यावर त्या फत्तरगीर बाबाच्या मठात गेल्या. त्याने श्रीमहाराजांची प्रशंसा करीत सांगितले की, “आपण पुढे जाण्याचा प्रयत्न करू नका. श्रीमहाराज लवकरच परत येतील, त्याना काहीही होणार नाही. ते सुखरूप परत येतील, चिंता करून नका.” तरीही आईसाहेबांनी हट्ट धरला आणि श्रीमहाराजांचे नाम घोकत राहिल्या. मग बाबाने वाट दाखविण्यासाठी एक सेवक दिला व त्या साने स्वामींच्या मठात गेल्या.

साने स्वामींनी मोठ्या आदराने श्रीमहाराजांचे गुणगान केले व आईसाहेबांना सल्ला दिला की, “तुम्ही परत जा. श्रीमहाराज हे सुखरूप परत येतील. पुढे गेल्यास ते तुम्हाला भेटणार नाहीत आणि ते परिक्रमा पूर्ण झाल्याशिवाय परत येणार नाहीत.” शेवटी आईसाहेब पुण्याला निराश होऊन परत आल्या. विठ्ठल-रुक्मिणीबद्दल त्याना अनन्य निष्ठा होती. त्यांची अखंड सेवा चालू केली. ज्या दिवशी श्रीमहाराज ओंकारेश्वरला परत आले, त्याच दिवशी आईसाहेबांना स्वप्न पडले की ते ओंकारेश्वरला परत आले आहेत. तेव्हा त्या ब्राह्मण व नोकर याना घेऊन ओंकारेश्वरला आल्या. ब्रह्मचारी स्वामींच्या मठात त्यांची भेट झाली. सर्वांना आनंद झाला. नंतर ते सर्व पुण्यास आले.

श्रीसद्गुरूंच्या आज्ञेने श्रीबीडकर महाराज यांनी अत्यंत कष्टमय आणि सत्त्वहरण करणारी नर्मदा-परिक्रमा पूर्ण केली. देह आणि प्राणाची पर्वा कधीही केली नाही. ही सर्व अवर्णनीय कहाणी आहे. वर्णिता न येई कहाणी.

* * *



# ७. वैराग्य

**यथा लाभ संतोष सदा**

नर्मदा परिक्रमेहून परत आल्यावर श्रीमहाराजांच्या स्वभावात मोठा फरक पडला. ते पुण्यात आपल्या कसबा पेठेतील घरात राहात होते, परंतु प्रसिद्धीपासून दूर असत. त्यांनी स्वत:ला देह-प्रारब्धाच्या हाती सोपविले होते आणि त्यात संतुष्ट राहून परमेश्वराच्या ध्यानात मग्न असत. गृहस्थाश्रमात असल्याने अतिथि-सत्कार मोठ्या प्रेमाने होत असे. काही वर्षांत घरातील साठविलेली बचत संपत गेली, तेव्हा परिस्थिती पाहून नातेवाईक व मित्रांनी काढता पाय घेतला. जे लोक त्यांना भाऊसाहेब सुगंधी किंवा भाऊसाहेब सराफ म्हणत असत, ते आता त्यांना वेड्यात काढू लागले. डोके फिरलेला माणूस, असे म्हणू लागले. तरीही कुणी येऊन काही मागितले तर ते उचलून देत असत. नाही, असे म्हणत नसत. कर्ज वाढत गेले आणि सावकार तगादा लावू लागले. तेव्हा त्यांनी आपले घर विकले व ते भाड्याच्या घरात राहू लागले. तेथे याचक येऊन त्रास देऊ लागले. सौ. जानकीबाई आईसाहेब त्यांचे हे औदार्य थांबवण्याचे प्रयत्न करीत, परंतु ते व्यर्थ होई. कुणी येऊन वस्त्र मागे कुणी जोडे तर कुणी पेला-भांडे. श्रीमहाराज काहीही संकोच न करता मागितलेली वस्तू देऊन टाकत. आईसाहेब टोमणे मारीत.

मग त्यांनी नवीन पद्धत सुरू केली. सकाळ होताच ते घरातून बाहेर पडत व परत येऊन आंघोळ व जेवण आटपून पुन्हा बाहेर जात. रात्री घरी येत असत. संध्याकाळी सोमेश्वराच्या मंदिरात जाऊन बसत. तेथे बाहेरून आलेल्या साधु-संन्याशांचा मुक्काम असे. एखादा सच्चा साधू भेटतोय काय, हे पाहात ते कोपऱ्यात बसत. नर्मदा-परिक्रमेहून परत आल्यावर जवळजवळ सहा वर्षे ते परमात्म-चिंतनामध्ये मग्न होऊन राहिले. मंदिरात एक साधू आला होता तो बासरी छान वाजवीत असे. वाजविताना तो नाद-ब्रह्मात बुडून जाई. ऐकणारा अगदी मुग्ध होत

असे. तो बासरी वाजण्यास बाहेर पडे, तेव्हा न मागता ५-६ रुपये जमत असत. मुक्कामी आल्यावर गरजेपुरते पैसे ठेवून बाकीचे वाटून टाकत असे. एके दिवशी श्रीमहाराज सोमेश्वराच्या मंदिरात जाऊन आपल्या कोपऱ्यातील जागेवर बसू लागले. एवढ्यात धुनीजवळ बसलेल्या साधूने हाक मारली, "बामण देवा, स्वत:ला असे लपविण्यात काय अर्थ आहे. इकडे या, इकडे." त्यांचा हात धरून त्याने त्यांना आपल्या धुनीजवळ बसविले. हे पाहून सर्व लोक चकित झाले. तो साधू आपल्या धुनीजवळ कुणालाही बसू देत नसे. त्याने आपल्या शिष्याकरवी चिलीम तयार करून श्रीमहाराजांच्या हाती दिली. त्यांनी जोराने दम मारला तेव्हा मोठी ज्वाळा निघाली. ते पाहून लोक चकित झाले. त्यांना कळून चुकले की हे कोणीतरी सिद्धपुरुष आहेत.

एक लोभी गोसावी कोपऱ्यात बसला होता. तो श्रीमहाराजांच्याजवळ येऊन विनवणी करू लागला की, "धुनीसाठी लाकूड नाही." ते त्याला म्हणाले की, "तुझ्या नशिबात असेल तर आत्ताच्या आता लाकडे मिळतील. आम्ही देणारे कोण व तू घेणारा कोण?" सर्वजण ऐकत होते. बासरीवाल्या साधूनेही ऐकले. दुपारी त्याला लाकडासाठी पैसे दिले होते, तरीही समाधान नाही. हे पाहून त्यालाही वाईट वाटले. श्रीमहाराजांचे बोलणे ऐकून मागणारा गोसावी नाराज झाला व पुटपुटत जाऊन आपल्या जागी बसला. तेथे बसलेल्या दोन-चार बैराग्यांबरोबर तो नालस्ती करीत भजन गाऊ लागला की, "दया धर्म नहीं मन में ...." बासरीवाल्या साधूला त्याचे हे वागणे बरे वाटले नाही. त्याने त्याला थांबवून सांगितले की, "कुणाचेही मन दुखवू नये. हा बामण देव मोठा सिद्धपुरुष आहे. पाजी जगापासून त्याने स्वत:ला लपवून ठेवले आहे. त्याला कमनशीब समजू नकोस." इतक्यात एक मारवाडी त्या मंदिरात आला. त्या गोसाव्याच्या धुनीजवळ लाकडे नाहीत, असे पाहून त्याने अर्धा मण लाकडे मागवून त्याला दिली. त्यावर तो गोसावी शरमिंदा झाला.

**लोकसंपर्क वाढला**

त्या काळी पुण्यात ठोसर व वाकनीस नावाचे दोन गृहस्थ होते. घरचे सुखवस्तू होते. वेळ काढण्यासाठी दिवसभर शहरात फिरून इतरांची विशेषत:



नव्या आलेल्याची टिंगल टवाळी करणे हेच त्यांचे काम. ही दुक्कल सोमेश्वराच्या मंदिरात आली आणि बासरीवाल्या साधूला पाहून टवाळी करू लागले. "बासरीवाले बाबा, तुम्हीतर कृष्णमूर्ती आहात. रंग तसाच आहे. बस, फक्त खाली दोन हात तेवढे कमी आहेत." त्या टिंगलीकडे साधू बाबाने लक्ष न देता म्हटले, "अच्छा, कन्हैयाची लीला अगाध आहे. तुम्हाला ती कशी समजणार? हे पाहा, हा ब्राह्मणदेव मोठा सिद्ध आहे. तुमच्या गावात आहे. जवळ असूनही तुम्ही त्याला ओळखत नाही. मग भगवान श्रीकृष्णाला कसे ओळखणार?" तेव्हा लाज वाटून त्यांनी श्रीमहाराजांना नमस्कार केला व त्यांचा पत्ता विचारला. त्या थट्टाखोर लोकांना तेच हवे होते. दुसऱ्या दिवशी ते श्रीमहाराजांच्या घरी हजर झाले. नंतर ते रोज येऊ लागले. आपल्या स्वभावाप्रमाणे त्यांनी श्रीमहाराजांना "सफेत साधू" असे नाव दिले. ते दोघे त्यांना बरोबर घेऊन फिरायला जात. आपल्या सवयीप्रमाणे रस्त्यात जो भेटे त्यांची टिंगल करीत. या निमित्ताने श्रीमहाराजांचा लोकांशी परिचय होऊ लागला. लोकांवर त्यांचा प्रभाव पडू लागला. त्यांच्या दर्शनाने काही लोकांची कामे होऊ लागली. काही लोक भक्ति-भावनेने त्यांच्याकडे येऊ लागले. हळूहळू श्रीमहाराज लोकांच्या संपर्कात येऊ लागले. काही भाविक त्यांच्या घरी शिधा पाठवू लागले.

**ढोंगी योगी**

मार्तंडमामा नावाचे एक गृहस्थ स्वत:ला योगी म्हणवून घेत असत. ते गीतेवर प्रवचन करीत असत. एके दिवशी योग-साधनेवर प्रवचन करताना ते कल्पनेने अतिरंजित वर्णन करून लोकांना प्रभावित करू लागले. चेष्टा करणाऱ्या दुक्कलीने श्रीमहाराजांना विचारले की, "भाऊसाहेब, तुम्ही तर योग जाणत असणार. आम्ही अज्ञानी आहोत." त्यांनी फाडकन उत्तर दिले की, "तुम्ही अज्ञानी आहात, हेच बरे. नाही तर कुणाला दाढी वाढविता आली नसती की कुणाला भगवी वस्त्रे नेसता आली नसती आणि कुणी योगाच्या गप्पा मारताना काल्पनिक मनोराज्य करू शकला नसता. जोपर्यंत कोणी स्वर्गात जात नाही, तोपर्यंत रंभाही दिसत नाही आणि अमृतही चाखायला मिळत नाही. मग शब्दांचा खेळ करण्यास काय जातंय? हाही एक धंदा आहे." हे बोलणे मार्तंडमामांना लागले. ते श्रीमहाराजांना म्हणाले की, "आपल्याजवळ सिद्धता असेल तर दाखवा."

श्रीमहाराज म्हणाले, "घरी याल तर दाखवू." मार्तंडमामा म्हणाले की, "घरी कशाला? इथेच दाखवा." तेव्हा श्रीमहाराजांनी आसन घातले. ते स्थिर बसून राहिले. मार्तंडमामांना अर्धा तासदेखील स्थिर राहाता आले नाही. शेवटी त्यांनी आपला पराभव मान्य केला व ते श्रीमहाराजांचा अधिकार मानू लागले.

**जळफळणारे शास्त्रीबुवा**

कसबा पेठेत महाराजांच्या शेजारी एक शास्त्रीबुवा राहात असत. पत्नी निवर्तल्यावर त्यांनी काहीही विचार न करता संन्यास घेतला. तो निभेना म्हणून ज्योतिषी झाले. ते श्रीमहाराजांवर विनाकारण जळफळत असत. एके दिवशी एक गृहस्थ कुंडली घेऊन शास्त्रीबुवांच्याजवळ आला. त्याने विचारले की पत्नी गरोदर आहे. ती केव्हा बाळंत होईल. शास्त्रीबुवांनी गणना करून सांगितले की, "आठ दिवसांनी मुलगी होईल. मूळ नक्षत्राची भीती आहे, तेव्हा जप, दान इत्यादी करावे लागेल." श्रीमहाराज तेथेच होते. त्यांचे मत विचारले तेव्हा ते म्हणाले, "दोन दिवसांत मुलगा होईल." त्यांचे म्हणणे खरे ठरले. तो गृहस्थ २५ लोकांचा शिधा व दोन रुपयांचे पेढे घेऊन आला. शास्त्रीबुवा चडफडले. ते श्रीमहाराजांची परीक्षा घेण्यासाठी रोज त्यांच्याकडे येऊ लागले. ठोकर-वाकनीस ही दुक्कल तेथे बसून सकाळ-संध्याकाळ टवाळी करीत असे. शास्त्रीबुवासुद्धा दिवसभर बसत असत. त्यांचे दुपारचे जेवणही तेथेच होऊ लागले. एके दिवशी ते टोमणा मारीत म्हणाले की, "आम्ही ज्वारीची भाकरी खाऊन वैतागलो. तोंडाची चव बदलावी म्हणून आपल्याकडे आलो तर येथेही तीच." श्रीमहाराज म्हणाले, "जे तुमचे होते, तेच तुमच्यापुढे आले. आम्हाला जे देह-प्रारब्धामुळे मिळते, ते जिलबी-लाडवापेक्षा जास्त आहे." इतक्यात एक भक्त पेढे घेऊन आला आणि २५ माणसांचा शिधा त्याने आणला. पाटीभर लाडूसुद्धा घेऊन आला. शास्त्रीबुवा पंधरा दिवस मिष्टान्न खात राहिले. ते लज्जित झाले, परंतु खोड अंगात असल्यामुळे लाचार होते. त्यांनी विचार केला की या भाऊसाहेबांचे पुण्यात चालते. जरा बाहेर जाऊन बघू या, म्हणून त्यांनी श्रीमहाराजांना काशी-यात्रेचा आग्रह धरला. श्रीमहाराजांकडे त्या वेळी ५-६ रुपयेच होते.

* * *



# ८. काशी यात्रा

**काशी यात्रेला प्रस्थान**

काशी यात्रेच्या बेतामुळे आईसाहेबांना फार आनंद झाला. काही भांडी, शिधा व कपडे घेऊन त्या तयार झाल्या. शास्त्रीबुवासुद्धा स्टेशनवर आले. तिघांची तिकिटे घेतल्यावर श्रीमहाराजांच्याजवळ फक्त सव्वा रुपया उरला, परंतु भगवंतांच्या भरवशावर ते निश्चिंत होते. ते सर्व लोक कल्याण स्टेशनला पोहोचले. तेथे शास्त्रीबुवांनी काही खाण्याची इच्छा दर्शविली, तेव्हा आईसाहेबांनी त्यांना लाडू दिला. शास्त्रीबुवा म्हणाले, "या वेळी दुधातल्या दशम्या असत्या तर किती बरे झाले असते." एवढ्यात श्रीमहाराजांचा एक भक्त कल्याण स्टेशनवर आला. त्याने चौकशी केली. घरी जाऊन त्याने दुधातल्या दशम्या बनविल्या आणि खाण्याचे काही पदार्थ घेऊन तो स्टेशनवर आला. त्याने नाशिकपर्यंतची तिकिटे काढून दिली आणि श्रीमहाराजांचे समोर दहाची नोट ठेवली. तिघांना गाडीत बसवून तो आनंदाने परत गेला. शास्त्रीबुवांना डोळ्यांनी पाहूनही हे रहस्य समजले नाही.

**नाशिकात**

तिघे नाशिकला पोहोचले. श्रीमहाराज आपल्या मुक्कामीच पडून राहिले. मुळव्याधीचे दुखणे होते, म्हणून ते बाहेर पडत नसत. खरेदीचे काम शास्त्रीबुवाच करीत असत. ते बाजारातून चांगले चांगले जिन्नस आणीत म्हणजे पैसे लवकर खर्च होतील व श्रीमहाराज आपल्याला पैशांची व्यवस्था करण्यास सांगतील, परंतु त्यांची इच्छा कधी पुरी होत नसे. पैसे संपल्यावर काही उपाय निघे. श्रीमहाराज बाहेर जात नसत, परंतु नाशिकमध्ये कुणी सिद्धपुरुष आल्याची बातमी लोकांच्या कानी पडली. मुंबईचा एका गुजराथी व्यापारी सट्टा खेळला होता. त्यात पन्नास हजारांचा फटका बसेल, अशी शंका होती. या संकटातून बाहेर पडण्यासाठी तो

एखाद्या सिद्ध-पुरुषाच्या शोधात नाशिकला आला होता. त्याला कळल्यावर तो पुजेचे साहित्य व पेढे-फळे घेऊन श्रीमहाराजांच्या सेवेला आला. त्याने आपल्यावर ओढविलेले संकट सांगितले; तेव्हा श्रीमहाराज म्हणाले की, "भगवंताला शरण जा. तो प्रेमाचा भुकेला आहे. तो भक्तवत्सल यातून निभावून नेईल." परंतु व्यापारी म्हणाला की, "आपल्या हातीच सर्व काही आहे. आपण मज गरिबावर कृपा करा." श्रीमहाराज म्हणाले, "दृढ भाव असेल तर तोच उपयोगी पडेल."

दोन दिवसांत त्या व्यापाऱ्याच्या मुनिमाची तार आली. सट्ट्यात नुकसान न होता दहा हजाराचा फायदाच झाला होता. लगेच तो श्रीमहाराजांच्या सेवेला हजर झाला. पूजा-सत्कार केल्यावर शंभराची नोट समोर ठेवून कृतज्ञ भावनेने परत गेला. ते पाहून शास्त्रीबुवांचे डोळे उघडले. त्यांना पश्चात्ताप वाटू लागला. श्रीमहाराजांची क्षमा मागून ते पुण्याला निघून गेले. सत्पुरुषाची परीक्षा घेण्यात त्यांचीच चूक होती.

**काशीमध्ये**

शास्त्रीबुवा परत गेल्यावर दोन-चार दिवसांनी श्रीमहाराज आईसाहेबांना घेऊन काशीला निघाले. गरजेपुरते पैसे ठेवून उरलेले वाटून टाकले. काशीला गेल्यावर ते नागपुरकरांच्या राममंदिरात गेले. तिथल्या पुजाऱ्याने त्यांची व्यवस्था ठेवली. योगायोग असा की श्रीमहाराजांनी तेथे पाय ठेवला, त्या दिवसापासून त्या मंदिरात पुष्कळ लोक येऊ लागले आणि देवापुढे जास्त पैसे जमू लागले. एक गृहस्थ श्रीरामासाठी नैवेद्य पाठवीत असत. आता ते श्रीमहाराजांसाठीही दोन ताटे भरून पाठवू लागले.

**कुंभमेळ्यासाठी प्रयागमध्ये**

याच दरम्यान कुंभमेळा आला, म्हणून श्रीमहाराज प्रयागला आले. संपूर्ण देशातून साधु-संन्यासी व भाविक हे या वेळी गंगा-स्नान करण्यासाठी प्रयागला येतात. अनेक संप्रदायातील व्रती आणि आखाड्यांतील हजारो साधु-गोसावी-संन्यासी-यती हे आपल्या सरंजामासह येतात आणि तेथे राहातात. त्यात शेकडो नंगे साधूही असतात. पर्वाच्या वेळी सर्वजण मिरवणुकीने शाही थाटामाटात स्नान करण्यास निघतात. त्या वर्षी इंग्रजांनी नग्नस्नान अयोग्य समजून त्यावर बंदी



घातली होती. साधूंना मज्जाव करण्यासाठी कडेकोट बंदोबस्त केला होता. शेकडो शस्त्रधारी घोडेस्वार शिपाई रस्ता रोखून उभे होते. त्यांचा प्रमुख असलेला कॅप्टन घोडदळ घेऊन आला होता.

श्रीमहाराज तेथे जाऊन मिरवणूक पाहात होते. त्या मिरवणुकीचे नेतृत्व हृषीकेशचे एक वयोवृद्ध सिद्धयोगी करीत होते. ते निर्भय होऊन पुढे जात होते. सरकार काय करणार, कोणास ठाऊक. नेतृत्व करणाऱ्या त्या परमहंस योग्याची नजर त्या गर्दीत उभ्या राहिलेल्या श्रीमहाराजांवर पडली. ते गर्दीतून श्रीमहाराजांच्याजवळ गेले आणि त्यांचा हात धरून म्हणाले की, "भाई, चलो हमारे साथ।" त्यांना ते मिरवणुकीत घेऊन आले. पाहणारे सर्वजण चकित होऊन गेले. याच वेळी इंग्रज कॅप्टन समोरून घोड्यावर बसून येत होता. त्याची नजर सिद्धयोग्यावर पडताच तो थबकला. आता तो काय अत्याचार करील, कोणास ठाऊक असे वाटत असतानाच त्याने टोपी उतरून त्यांच्यासमोर मस्तक लवविले. सिद्धयोग्याने संतापून विचारले की, "हिंदू धर्म बुडवायला निघालास का?" हे शब्द ऐकताच कॅप्टनवर मोठा प्रभाव पडला आणि लगेच घोड्यावर बसून त्याने बंदी हटविण्याचा हुकूम दिला. इंग्रजांचे सैनिक बाजूला झाले आणि गर्दीतील लोक सिद्धांचा जयजयकार करू लागले. दुमदूमून टाकणाऱ्या जयजयकारात त्या सिद्धयोग्यांनी श्रीमहाराजांच्या बरोबर पवित्र गंगास्नान केले. सर्व यात्रेकरूंना कळून चुकले की श्रीमहाराज हे उच्च कोटीचे सिद्ध आहेत. स्वत: सिद्धयोग्यांनी त्यांना मान दिला.

श्रीमहाराज जोपर्यंत प्रयागमध्ये होते, तोपर्यंत ते त्या सिद्धयोग्यांना भेटण्यास जात असत आणि त्यांना मोठ्या प्रेमाने आदराने भेटत असत. सौ. जानकीबाई आईसाहेब यांनीही प्रयागमध्ये आपल्याला हवी ती धार्मिक कृत्ये केली. नंतर ते काशीला दोघे आले.

**काशीत पांडुरंगभट**

काशीला श्रीमहाराज ब्रह्म घाटावरील एका घराच्या वरच्या मजल्यावर राहात होते. पांडुरंगभट भडकमकर या नावाचे एक दशग्रंथी विद्वान ब्राह्मण काशीला येऊन त्याच घराच्या खालच्या मजल्यावर राहात होते. काशीतील शास्त्री-पंडित

त्यांचा अधिकार मानीत होते, परंतु स्वत: शास्त्री हे शक्यतो लोकांपासून दूर राहून शिवाची सेवा करीत असत. सकाळी स्नान करून दोन हातात गंगाजलाच्या दोन घागरी घेऊन रुद्रपठण करीत ते विश्वेश्वराला अभिषेक घालीत. दुपारपर्यंत वारंवार गंगेचे जल आणून अभिषेक घालण्याचा त्यांचा क्रम चाललेला असे.

श्रावण मास आला तेव्हा शास्त्रींच्या पत्नीच्या मनात शिवामूठ अर्पण करण्याचा विचार आला. स्त्रिया प्रत्येक श्रावण सोमवारी मूठभर तांदूळ, तीळ, मूग, आळशी यासारखे अन्नधान्य शिवशंकर हे अन्नपती असल्यामुळे त्यांना अर्पण करतात. पतीची अनुमती मिळाल्यावर तिने ठरल्या दिवशी मंदिरात जाण्याचे ठरविले. त्याच रात्री पांडुरंगभट यांना शिवशंकरांनी स्वप्नात येऊन सांगितले की, "तू जेथे राहतोस, त्याच माडीवर मी राहातो. तिथे शिवामूठ अर्पण केल्यास ती मला मिळेल." त्यांनी स्वप्नातील दृष्टांत आपल्या बायकोला सांगितला. ती म्हणाली की, "मला जर असा दृष्टांत झाला तर मी मान्य करीन." जेव्हा दुसऱ्या दिवशी तिलाही दृष्टांत झाला तेव्हा दोघांचा विश्वास बसला.

पांडुरंगभट काशीला आले होते. तेव्हापासून क्रिया-कर्मात मग्न असत. शेजारी कोण राहाते याचेकडे त्यांचे लक्ष नव्हते. भट पति-पत्नी दोघेही वरच्या मजल्यावर गेले. श्रीमहाराज खोलीत झोपले होते व आईसाहेब देव-दर्शनाला गेल्या होत्या. दरवाजा बंद होता. भट पति-पत्नी हे तेथे बसून राहिले. बारा वाजता आईसाहेब परत आल्या तेव्हा दार उघडले. पांडुरंगभटांनी आत जाऊन श्रीमहाराजांच्या चरणी लोटांगण घातले आणि त्यांना स्वप्न दृष्टांत सांगितला. श्रीमहाराज म्हणाले, "आम्ही देह प्रारब्ध भोगत येथे पडून आहोत. आमचे स्नान-संध्यादी येथे अंथरूणावरच होतात. तुमचा जसा भाव असेल तसे करा." भटांच्या बायकोने श्रीमहाराजांचे चरणी शिवामूठ अर्पण केली. त्या पति-पत्नींना कळून आले की श्रीमहाराज प्रत्यक्ष काशी विश्वेश्वर आहेत आणि ते सर्व प्रकारे त्यांची सेवा करू लागले.

पांडुरंगभट हे श्रीमहाराजांचेबरोबर वेदांत विषयक चर्चा करीत. श्रीमहाराजांनी त्यांना आत्म-दर्शन घडविले. भटांना श्रीदेव काशी-विश्वनाथ आणि श्रीमहाराज यांच्या चरणी दृढ भक्तिभाव निर्माण झाला. दशग्रंथी ब्राह्मण असल्यामुळे



लोक भट यांना बोलावीत असत. काशीतील ब्राह्मण त्यांची चेष्टा करीत असत की पांडुरंगभट एका म्हाताऱ्या वेड्या बुवाच्या नादी लागले आहेत. ब्राह्मण त्यांना म्हणत असत की, "त्या वेड्या म्हाताऱ्याच्या नादी लागू नका." ते लोक श्रीमहाराज आणि भट यांची थट्टा करीत असत. तेव्हा भट त्यांना रागावले. तरीही काही ब्राह्मणांना श्रीमहाराजांचे मोठेपण ठाऊक होते.

**ब्राह्मणांचे गर्वहरण**

एक श्रीमंत गृहस्थ पांडुरंगभट यांना मानत असत. त्यांना भटांच्याकडून श्रीमहाराजांचे मोठेपण कळले. श्रीमहाराजांच्या पद-स्पर्शाने आपले घर पवित्र व्हावे, असे त्यांना वाटत होते. त्यांनी मंत्र-जागरासाठी श्रीमहाराजांना पाचारण केले. ते त्यांना पालखीत बसवून घेऊन गेले. तेथे बरेच ब्राह्मण आले होते. श्रीमहाराजांना व्यासपीठावर बसविले होते. ही गोष्ट खट्याळ ब्राह्मणांना आवडली नाही. ते श्रीमहाराजांना म्हणाले, " मंत्रपठण आपणच सुरू करा." तेव्हा सद्गुरूंचे स्मरण करून ते ध्यानस्थ झाले. त्यांच्या प्रभावामुळे ब्राह्मणसुद्धा गप्प झाले. तेव्हा तो श्रीमंत गृहस्थ श्रीमहाराजांना शरण गेला व त्यांची प्रार्थना करू लागला. जागृत झाल्यावर त्यांनी ब्राह्मणांना मंत्रपठण करण्यास सांगितले आणि ते आपला अहंकार सोडून पठण करू लागले. सर्वांनी श्रीमहाराजांना साष्टांग नमस्कार केला. सर्वजण त्यांना मान देऊ लागले.

**कृष्णानंद स्वामी**

एके दिवशी श्रीमहाराज व पांडुरंगभट हे गंगा किनारी निघाले होते. वाटेत कृष्णानंद स्वामींचा मठ होता. त्याच वेळी स्वामी मठातून बाहेर पडले. त्यांना पाहून भटांनी नमस्कार केला, परंतु महाराजांनी केला नाही. भटांकडून ओळख झाल्यावर स्वामींनी श्रीमहाराजांना बसवून घेतले आणि ते त्यांच्याशी पारमार्थिक चर्चा करू लागले. त्यांनी स्वामींना सांगितले की, केवळ "अहं ब्रह्मासि" घोकून काही उपयोग नाही. त्याची अनुभूती निर्माण झाली पाहिजे."

**अजगर स्वामी**

एकदा श्रीमहाराजांची अजगर स्वामींशी भेट झाली. ते अजगर वृत्तीने राहात असत. त्यांनी आपली देह-ममता पूर्णपणे सोडून दिली होती. ते कडाक्याच्या

उन्हात तापलेल्या वाळूत अगर पावसाळ्यात पूर आलेल्या गंगेमध्ये तासनतास उभे राहात. त्यांनी महाराजांना मोठ्या प्रेमाने "आओ बेटा" म्हणून आपल्या जवळ बोलावून सांगितले की, "प्रत्यक्ष श्रीकाशी-विश्वनाथाने तुला मान दिला आहे, मग तुला एखाद्या कृष्णानंदाची किंवा अजगर स्वामीची गरज काय?"

**गयेची यात्रा**

काशीला आणि प्रयागला दहा-अकरा महिने घालविल्यावर श्रीमहाराज गया या क्षेत्री गेले. पांडुरंगभट यांनी एका गयावळला पत्र लिहिले होते की श्रीमहाराज हे सिद्ध-पुरुष आहेत, त्यांची चोख व्यवस्था ठेवा. तो गयावळ खूप श्रीमंत होता. श्रीमहाराजांच्या स्वागतासाठी तो स्वत: स्टेशनवर आला. श्रीमहाराजांचे मळकट कपडे पाहून त्याची निराशा झाली की हा कसला सिद्धपुरुष?

त्या गयावळाची दोन लग्ने झाली होती आणि दोन्ही बायका निवर्तल्या होत्या. सिद्धपुरुषाच्या कृपेने तिसरे लग्न होईल, म्हणून तो स्टेशनवर आला होता. त्याने श्रीमहाराजांना शोधून सांगितले की, "आपली ख्याती ऐकून मी स्वत:च आपल्याला घेऊन जायला आलो आहे." तेव्हा श्रीमहाराज म्हणाले, "हमारे वास्ते आए हो, या अपनी औरत के वास्ते? आपल्या मनाला हे विचार." हे ऐकताच गयावळाला त्यांची योग्यता पटली. घरी आणून त्याने त्यांचा मोठा सत्कार केला आणि लग्नाची मनोकामना पूर्ण करण्याची विनंती केली. ते म्हणाले, "पंढरपूरच्या भगवान विठ्ठलाने पुंडलीक, नामदेव, तुकाराम इत्यादी भक्तांवर कृपा केली. तो आजही कृपाळू आहे. काहीही फरक नाही. जसा भाव, तसे फळ. भक्तिभाव असेल तर आठ दिवसांत मनोकामना पूर्ण होईल." आणि खरोखरच आठ दिवसांत त्याचे लग्न झाले. तो श्रीमहाराजांना परमेश्वर मानू लागला. गयेमध्ये ते परमात्म-चिंतनात गर्क झाले.

**भांग-चंडूची नशा**

गयेमध्ये श्रीमहाराजांची कीर्ती पसरली. ते त्या गयावळाबरोबर फिरायला जात. गयेमध्ये मोठ्या प्रमाणावर गांजा, भांग, चरस यांची नशा करण्याची प्रथा आहे. घरोघरी भांग तयार होते. एकरंगी पासून दहारंगीपर्यंत. जर कोणी नवशिक्या असेल तर भांग पीताच आडवा होतो. एकदा श्रीमहाराजांनाही मुद्दाम भाग देण्यात



आली, परंतु श्रीमहाराजांना काहीही नशा चढली नाही. दुसऱ्या दिवशी त्याना नवरंगी भांग पाजविली. काहीही परिणाम झाला नाही.

तेव्हा ते लोक त्याना चंडूखान्यात घेऊन गेले. त्या ठिकाणी एक मोठा मांत्रिक होता. त्याने लक्ष्मीनारायणाचे मंदिर बनविले होते. तेथे चरस, चंडोल पिण्याचा अड्डा होता. चंडोल पिण्यात त्याचा हात धरणारा कोणी नव्हता, म्हणून लोक त्याला मान देत आणि तो गर्वाने फुगलेला असे. सिद्धीच्या जोरावर तो चमत्कार करीत असे. लोकांच्याकडून पैसा मिळवी व नशेत चूर राहात असे. त्याने भगवंताच्या मंदिराचा चंडूखाना बनवून टाकला होता. कोणी एखादा नवखा तिथे गेला तर त्याला नशा करायला लावून त्याची फजिती पाहण्यात तिथल्या लोकांना मजा वाटत असे.

काही लोक श्रीमहाराजांना या अड्ड्यावर घेऊन गेले. सुरवातीला चरसाच्या चिलमी ओढल्या, पण नशा आली नाही. तेव्हा लोकांनी चंडोलाची चिलीम तयार करून श्रीमहाराजांच्या हाती दिली. चंडोल पिणारा माणूस लोडाला टेकून बसतो; कारण चंडोलाचा दम मारताच तो जमिनीवर लोळण घेतो. श्रीमहाराजांची चिलीम जळून खाक झाली, तरी त्यांच्यावर नशेचा काहीही परिणाम झाला नाही. ते तेथून बाहेर पडले व जवळच्या मारुतीच्या देवळात पद्मासन घालून व डोळ्यावर पांघरूण घेऊन बसले.

मांत्रिकाला कळल्यावर तो घाबरला. त्याला खात्री पटली की श्रीमहाराज हे सिद्धयोगी आहेत. त्याला आपल्या कृत्याबद्दल पश्चात्ताप होऊ लागला. ते रुष्ट होऊ नयेत म्हणून तो पूजेचे साहित्य घेऊन त्यांच्यापाशी गेला आणि ते उठण्याची वाट पाहू लागला. श्रीमहाराज दहा वाजता जागे झाले आणि त्यांनी डोक्यावरचे वस्त्र काढले. मांत्रिकाने क्षमायाचना केली आणि पूजा स्वीकारण्याची विनंती केली. तेव्हा ते म्हणाले, "जे काही घडले ते भगवंताच्या इच्छेने बरेच झाले. परंतु तुला पाहून मला मोठा खेद वाटतो. प्रत्येक प्राणी हा सुखासाठी धडपडत असतो. त्याला जे आवडते, त्यालाच तो धर्म मानू लागतो. याचा दुसऱ्यावर काय परिणाम होईल, याचा तो विचारही करीत नाही."

मांत्रिकाने विचारले की, "जगात सुख मिळविण्याचा प्रयत्न करायचा

नाही तर मग काय करायचे ? योग, दान, तप इत्यादी गोष्टी सुखासाठीच असतात ना ? सुख हे सगळे सारखेच असते. मग अमुक तऱ्हेचे सुख मिळविण्याचा आग्रह कशासाठी धरावा ?"

श्रीमहाराज म्हणाले की, "कारण आपल्याला त्याची सवय झाली आहे आणि ती सुटत नाही. तू भगवंताचे देऊळ बांधलेस आणि त्याचा चंडूखाना बनविलास. वरवर सर्व सुखे ही सारखीच वाटतात. सत्त्वगुणामुळे मिळणारे सुख व तमोगुणामुळे मिळणारे सुख यात फरक वाटत नाही. दारूच्या नशेत असलेल्या मनुष्यात व गाढ झोपलेल्या मनुष्यात काहीही फरक नाही. परंतु पहिल्यामध्ये अज्ञान आहे आणि दुसऱ्यामध्ये ज्ञान. त्यामध्ये जमीन-अस्मानचा फरक आहे. तमोगुण हा अज्ञानामध्ये परिणत होतो, तर सत्त्वगुण ज्ञानात. तमोगुण हा अध:पतनास घेऊन जातो तर सत्त्वगुण हा मोक्षाच्या दाराकडे नेतो. मोठ्या विद्या या मोठ्या कष्टाने मिळतात. तू मंत्रविद्या मोठ्या कष्टाने मिळविलीस, परंतु तिचा उपयोग तमोगुण वाढविण्यासाठी करीत आहेस. अशा विद्येचा उपयोग परोपकारासाठी, दुसऱ्याचे दु:ख नाहीसे करण्यासाठी करावा. त्यासाठी पैसा घेऊ नये. कारण भगवंत हा सर्वांचा योगक्षेम चालवितो. तू मंदिरात भगवंताच्या सान्निध्यात राहतोस. स्वत:ला सावर तीच माझी पूजा असे समज. इतर पूजेची गरज नाही."

श्रीमहाराजांच्या शब्दांचा त्या मांत्रिकावर मोठा परिणाम झाला. त्याने आपली चूक मान्य केली आणि वाईट सवयी सोडण्याची शपथ घेतली. श्रीमहाराजांची इच्छा नसताना त्याने त्यांना हार घातला व घरी पोहोचविले.

गयेमध्ये श्राद्धादी कर्मे करून व विष्णुपदावर पिंडदान केल्यावर श्रीमहाराज व आईसाहेब पुण्याला आल्या.

* * *



# ९. इतर यात्रा

**औदुंबरला**

काशी-प्रयाग-गया अशी त्रिस्थळी यात्रा करून आल्यानंतर काही दिवसांनी श्रीमहाराज औदुंबरला गेले. औदुंबर सांगली जिल्ह्यातील कृष्णा नदीच्या तटावर वसलेले रमणीय स्थान आहे. तेथे दत्तावतार श्रीनृसिंह सरस्वती यांनी चतुर्मासात वास केला होता. हे दत्तोपासनेचे जागृत स्थान मानले जाते. त्याच्या अगदी समोर नदीच्या पलीकडील तटावर भिलवडीला भुवनेश्वरीचे मंदिर आहे. श्रीमहाराज व आईसाहेब जेव्हा भुवनेश्वरीच्या मंदिरात पोहोचले तेव्हा सूर्य मावळला होता. पलीकडे औदुंबरला जाण्यासाठी नाव नव्हती. थंडी येऊ लागली होती. आईसाहेबांना हुडहुडी भरत होती. श्रीमहाराज गप्प पडून राहिले. सकाळपर्यंत नाव चालू होण्याची शक्यता नव्हती. एवढ्यात अचानक एक नावाडी नाव घेऊन आला आणि औदुंबरला जाण्यासाठी ओरडून विचारू लागला. रात्रीचा अंधार दाटत होता. ती दोघे नावेतून पलीकडे बापटाच्या धर्मशाळेत पोहोचली. त्यांनी तिथल्या कारभाऱ्याकडे खोली मागितली, परंतु या यात्रेकरूंकडून काही मिळणार नाही म्हणून तो टाळण्याचा प्रयत्न करू लागला. शेवटी एकदा त्याने एक खोली दिली. त्या मोकळ्या पडलेल्या धर्मशाळेत गावातले काही लोक वेळ घालविण्यासाठी येत असत आणि थट्टा मस्करी करीत बसत. त्या रात्री गांजा ओढून ते श्रीमहाराजांची टिंगल करीत बसले.

दुसऱ्या दिवशी सकाळी आईसाहेबांनी तीर्थ-स्नान व देवपूजा केली. श्रीमहाराज आपल्या खोलीत पडून परमात्म्याचे ध्यान करीत राहिले. सकाळी कारभारी जागा झाला, एवढ्यात श्रीदत्त प्रभूंचा पुजारी धावत आला. तो म्हणाला की, "स्वप्नात येऊन दत्त महाराजांनी सांगितले की माझा नैवेद्य बापट धर्मशाळेत मला पोहोचव." पुजाऱ्याचे ऐकल्यावर कारभाऱ्याला उमगले की

खोलीत राहणारे कोणी सिद्धपुरुष आहेत. तो श्रीमहाराजांच्याजवळ जाऊन क्षमा-याचना करू लागला. ते म्हणाले, "तुझी चूक झाली असली, तर दत्त महाराजांना क्षमा माग. तू त्यांच्या आश्रयास राहतोस. त्यांची सेवा करीत राहा. गप्पा मारत बसण्यात आणि गांजा पिण्यात आयुष्याचा नाश करू नकोस."

तेथे पांगळेशास्त्री नावाचे गृहस्थ सिद्धी प्राप्त करण्यासाठी श्रीगणेशाचे अनुष्ठान करीत होते. त्यांना थोडीशी सिद्धीही मिळाली होती. ते मंत्रसिद्धीच्या जोरावर लोकांकडून पैसे मिळवीत आणि चैनीत राहात होते. बातमी कळताच ते श्रीमहाराजांना भेटण्यास गेले. औदुंबरला येऊनही श्रीमहाराजांनी स्नानसुद्धा केले नाही, म्हणून शास्त्री त्यांना टोमणा मारू लागले. तेव्हा ते म्हणाले की, "माणसाने दुसऱ्याकडे नव्हे तर स्वत:कडे बघावे. क्षुल्लक मंत्र-सिद्धीने पैसा मिळवून इंद्रिय-सुख घेतल्यास नरक मिळेल. तोंडात किडे वळवळू लागतील. हा परमार्थाचा मार्ग नव्हे."

शास्त्रीबुवा ओशाळून तेथून निसटले. त्या रात्री त्यांना स्वप्न पडले की त्यांना वाचा-सिद्धी झालेली आहे. लोकांच्या अडचणी दूर होऊ लागल्यात त्यांना आदर-सन्मान, प्रसिद्धी व पैसा मिळू लागला आहे. ते थाटात राहू लागले. भोवताली शिष्यांची गर्दी आहे. त्यांची शिष्यिणींशी सलगी वाढली आहे आणि लोकांना त्यांचे दर्शन मिळणे अवघड झाले आहे. शेवटी त्यांना अमांश झाला आणि अशक्त होऊन ते अंथरूणावर पडले आहेत. अंथरूणातच मल-मूत्र होऊ लागले. तोंडातील किडे वळवळत आहेत, असे त्यांना वाटू लागले. तोंडातील किडे काढून टाकण्यासाठी ते ओरडू लागले. एका सेविकेने तोंडात बोटे घालून सांगितले की तोंडात काहीही नाही. त्यांनी तिला शिव्या देत मारायला हात उचलला. तो समईवर पडून ती विझली. ते जागे झाले.

स्वप्नामुळे घाबरून ते श्रीमहाराजांच्याजवळ आले आणि मार्ग दाखविण्यासाठी विनंती करू लागले. त्यांनी शास्त्रीबुवांना सांगितले की, "पैशासाठी साधन करणे योग्य नव्हे. सिद्धी या वारांगनेप्रमाणे असतात. त्या क्षणिक सुख देऊन निघून जातात. पुण्य-क्षेत्री राहून अशी कुकर्मे करण्यामध्ये आत्मनाश आहे. मंत्रसिद्धी ही मिळविता येते, परंतु योग-सिद्धी भगवंतांच्या



कृपेमुळे प्राप्त होते." श्रीमहाराजांनी दिलेल्या उपदेशामुळे शास्त्रीबुवांचे आयुष्य बदलून गेले.

**ज्योतिबाचे दर्शन**

औदुंबरहून ते दत्तक्षेत्र नृसिंहवाडीला गेले. तेथून कोल्हापूरला जाऊन महालक्ष्मीचे दर्शन घेतले. कोल्हापूरजवळ ज्योतिबाचा डोंगर आहे. तेथील ज्योतिबाचे मंदिर फार प्रसिद्ध आहे. श्रीमहाराज व आईसाहेब ज्योतिबाच्या डोंगराला निघाले. त्याच दिवशी ज्योतिबाचा पुजारी असलेल्या गोविंदभट खट्याळ याला स्वप्न पडले. ज्योतिबाने स्वप्नात येऊन सांगितले की, " माझा भक्त कोल्हापूरहून येत आहे. त्याची चोख व्यवस्था ठेव."

तेथील धर्मशाळेत गेल्यावर आईसाहेबांनी खीर बनवून श्रीमहाराजांना दिली आणि शनिवारचा उपवास असल्यामुळे त्यानी फलाहार केला. श्रीमहाराज आत्म-स्वरूपात मग्न होऊन झोपून राहिले. थोड्याच वेळात उमद्या घोड्यावर बसून एका रुबाबदार सरदाराने येऊन विचारले, "बाबा झोपले आहेत काय ? मी दर्शनासाठी कोल्हापूरला जात आहे. संध्याकाळी परत येईन, मग दर्शनाला या." श्रीमहाराज जागे झाल्यावर आईसाहेबांनी हे त्यांना सांगितले. तेव्हा ते म्हणाले की, "सरकार दरबारात आमचे काही काम नाही. त्यांचे काम असेल तर ते येतील." खट्याळ पुजारीही येऊन पोहोचला. तो त्यांना आपल्या घरी घेऊन गेला. संध्याकाळी भगवान ज्योतिबाचे दर्शन झाले. बाहेर मंदिराच्या अंगणात सजलेला घोडा उभा होता. आईसाहेबांनी ओळखले की ज्यावर बसून सरदार आला होता, तोच हा घोडा आहे. श्रीमहाराज त्यांना म्हणाले की, "तुम्हाला प्रत्यक्ष ज्योतिबाने दर्शन दिले आहे." आईसाहेबांना गहिवरून आले. घोडा घामाने निथळत होता. प्रत्येक दिवशी घोड्याला सजवून उभे केले जाते. ज्योतिबा घोड्यावर बसून श्रीमहालक्ष्मीचे दर्शन घेऊन संध्याकाळी परत येतो. अंगणातील घोडा जेव्हा घामाने थबथबतो तेव्हा देव कोल्हापूरहून परत आले असे मानले जाते.

काही दिवस तेथे गेल्यावर श्रीमहाराज पुण्याला परतू लागले. तेव्हा खट्याळ पुजारी त्यांना निरोप देण्यासाठी लांबवर गेला. त्याने श्रीमहाराजांना उपदेश देण्याविषयी विनंती केली. तेव्हा त्यांनी सांगितले की, "पोट भरण्यापुरते

अन्न आणि चांगली संगत लाभली तर निम्मे काम झाले, असे समजा. मोठ्या भाग्याने तुला देवाची संगती लाभली आहे. त्यांची सेवा करीत राहशील तर तुला कोणतीही कमतरता भासणार नाही. देव हा आपल्या मनातच असतो. जेव्हा मन हे विकारांनी मलिन होते, तेव्हा देव दिसत नाही. दुनिया ही देवाण-घेवाणीवर चालते. तू दुसऱ्याचे वाईट चिंतलेस तर तुझ्या पदरी वाईट येते. या जगात जी थोडीशी सेवा घडेल, ती मन:पूर्वक करशील तर ती श्रेष्ठ होय. देव हा भावाचा भुकेला आहे."

**आळंदीमध्ये**

श्रीमहाराज हे जगापासून अलिप्त राहण्याचा प्रयत्न करीत. आईसाहेबांचे आयुष्य संपन्न घरामध्ये गेले होते. आता चणचण भासू लागली, ही गोष्ट त्याना बोचत होती. त्यांची अवस्था त्या टोमणे मारून व्यक्त करीत. अशा अवस्थेत श्रीमहाराजांच्या मनास दूर कुठे तरी निघून जावे असे वाटत असे. एके दिवशी ते आळंदीला निघाले. घरातून बाहेर पडताच जोराचा पाऊस आला, परंतु ते न थांबता भिजतभिजत चालले. रस्त्यात एक धर्मशाळा होती, त्या धर्मशाळेत ज्ञानेश्वर महाराजांच्या पादुका होत्या. तेथे त्यांनी आश्रय घेतला. तिथल्या लोकांनी त्यांना कोरडी वस्त्रे दिली आणि शेकण्यासाठी शेकोटी लावली.

दुसऱ्या दिवशी सकाळी निघून ते आळंदीला पोहोचले, तर तेथे एक ब्राह्मण त्यांची वाट पाहात बसला होता. तो त्यांना घरी घेऊन गेला. त्याने उटणे व सुवासिक तेल चोळून त्यांना स्नान घातले. मोठ्या आदराने सोवळे नेसवून पक्वान्नाचे जेवण घातले. विडा आणि दक्षिणा दिली. श्रीमहाराजांनी विडा घेतला व दक्षिणा ज्ञानेश्वर महाराजांना अर्पण करण्यास सांगितले. एका अनोळखी माणसाकडून आतिथ्य झाल्यामुळे श्रीमहाराजांना आश्चर्य वाटले. त्यांनी विचारल्यावर त्याने सांगितले की, "मी आळंदीमध्ये दोन महिने अनुष्ठान करीत आहे. काल रात्री माझ्या स्वप्नात श्रीज्ञानेश्वर महाराजांनी येऊन सांगितले की, "तुझे अनुष्ठान सफळ होण्यासाठी मी उद्या दहा वाजता येत आहे. माझ्या स्नानाची व भोजनाची चांगली व्यवस्था ठेव." त्याने ज्ञानेश्वर महाराजांचा जयजयकार करीत श्रीमहाराजांना लोटांगण घातले. अशा उपाधींपासून दूर राहण्यासाठी त्यांनी मंदिरातच राहण्याचे



ठरविले. मग त्या ब्राह्मणाने एक ओसरी स्वच्छ करून दिली. श्रीमहाराजांनी श्रीज्ञानेश्वर महाराजांचे दर्शन घेतले व ते ओसरीत येऊन झोपले.

परमात्म्याचे चिंतन करीत ते असे मग्न झाले की रात्री अकरा वाजता ध्यानातून जागे झाले. चांदणे विखुरले होते. कुणाची तरी चाहूल लागल्यामुळे श्रीमहाराजांनी तिकडे पाहिले. तर एक सुंदर तरुणी नटूनथटून त्याना वश करून घेण्यासाठी कामुकतेने दृष्टी टाकत उभी होती. त्या सुंदरीने विनंती केली की, "आमचे आतिथ्य स्वीकारा." तेव्हा श्रीमहाराज म्हणाले, "ज्ञानेश्वर महाराजांकडून आमचे योग्य प्रकारे आतिथ्य झाले आहे. आमचा त्यांना निरोप द्या की आम्ही बेसावध नाही." हे ऐकताच ती सुंदरी पाहता-पाहता अदृश्य झाली. श्रीमहाराज भगवंताची ही लीला पाहून चकित झाले.

**आळंदीचे श्रीनृसिंह सरस्वती**

दुसऱ्या दिवशी श्रीमहाराज आळंदीतील प्रसिद्ध सत्पुरुष श्रीनृसिंह सरस्वतींना भेटायला गेले. त्यांना पाहताच स्वामींनी त्यांचे मोठ्या आदराने स्वागत केले व आपल्याजवळ बसवून घेतले. "त्यांच्यामध्ये पारमार्थिक चर्चा होऊ लागली. स्वामी म्हणाले, "भटकून शरीराला कष्ट देण्यापेक्षा एका ठिकाणी राहून साधन केल्याने ते फलद्रूप होते." त्यावर श्रीमहाराजांनी सांगितले की, "शरीराची ममता ही योगमार्गात विघ्न आणते. ती ममता एखाद्या विशिष्ट मार्गाने दूर होते, असे म्हणता येत नाही. ज्याला जो मार्ग सोयीचा वाटेल, त्याने तो स्वीकारावा. कोणत्याही यम-नियमांच्या भानगडीत न पडता, देह-प्रारब्ध हे भोगूनच संपविले पाहिजे. सुख मिळो अगर दुःखच सोसावे लागो, म्हणून प्रारब्ध भोगण्याचा हा संकल्प केला पाहिजे." श्रीमहाराजांचे बोलणे ऐकून स्वामींना संतोष वाटला. दोन दिवस स्वामींच्याजवळ राहून नंतर श्रीमहाराज संत तुकाराम महाराजांच्या देहू गावाकडे निघाले.

**देहूमध्ये**

श्रीमहाराज आळंदीहून देहूला आले. श्रीसंत तुकाराम महाराज यांचे दर्शन घेऊन मंदिरातील एका फळीवर कोपऱ्यात ध्यान करीत बसले. दुसऱ्या दिवशी कृष्ण जन्माष्टमी होती. दुपारनंतर वारकऱ्यांचे जत्थे भजन करीतकरीत येऊ

लागले. टाळ मृदुंगाच्या गजराने वातावरण भरून गेले. त्या दिवशी मंदिरातील विठ्ठलाला पंचामृताने स्नान घालण्याची प्रथा आहे. भक्तजन देवाला पंचामृत-स्नान घालून प्रसाद घेऊन जात होते. परंतु त्या गर्दीत कुणाचेही लक्ष श्रीमहाराजांच्याकडे गेले नाही. ते दिवसभर उपाशी होते. अर्ध्या रात्री कुणीतरी त्यांना वाटीभर पंचामृताचा प्रसाद दिला. दुसऱ्या दिवशी जन्माष्टमीचा उपवास होता. श्रीमहाराज देहूतील मंदिरांचे दर्शन घेऊन पुन्हा फळीवर येऊन बसले. दुपारी कुणीतरी त्यांना शेंगदाणे, गूळ व दोन केळी आणून दिली. त्यातील थोडेसे खाऊन ते ध्यानाला बसले. जन्माष्टमीचा उत्सव झाल्यावर त्यांना प्रसाद मिळाला. प्रल्हाद नावाचा एक गृहस्थ त्यांना आपल्या घरी घेऊन गेला. जेवणानंतर ते तुकाराम महाराज जेथे नित्य भजन करीत असत त्या डोंगराकडे निघाले.

**शिवशंकराचे दर्शन**

डोंगराच्या पायथ्याला शिवाचे प्राचीन व भव्य मंदिर आहे. तेथे कोणीही जात-येत नसे. भगवंताला अर्पण करण्यासाठी श्रीमहाराज निर्गुंडीची पाने घेऊन आले. गर्भगृह खाली होते आणि तेथे दाट अंधार होता. पाकोळ्या उडून बाहेर येत होत्या. शिवलिंगाला स्नान घालण्यासाठी श्रीमहाराजांचेपाशी भांडे नव्हते. तेव्हा त्यांनी पंचा भिजवून आणला. ते आत जाऊ लागले तर एक नागराज बाहेर पडला. संकल्पाप्रमाणे त्यांनी पूजा करून शिवाला साष्टांग नमस्कार केला आणि आनंदाने बाहेर आले.

त्यांनी आग पेटविण्यासाठी लाकडे गोळा केली, परंतु चकमक किंवा आगपेटी कुठून येणार? त्यांनी मंदिर धुंडाळले. एका कोपऱ्यात एक कट्टा होता. त्यावर एक पुरुषभर उंचीचे बळत बनविले होते. त्यावर एक मडके ठेवले होते. ते बाजूला करताच तेथे तेलाची बाटली, आगपेटी, तांदळाची पिशवी, पिठाची पोटली, गांजाची चिलीम आणि गरजेची भांडीही होती. पैशाची थैलीही तेथे होती. न मागता सर्व काही मिळाले. श्रीमहाराजांनी दिवा लावला. भगवान शिवाची पूजा केली. भात-पिठले तयार करून नैवेद्य दाखविला. धुनी पेटवून ते भगवंताच्या ध्यानास बसले. अर्ध्या रात्री मंदिरात अचानक दिव्य प्रकाश पसरला. भगवान शिव हे पार्वतीमातेसह प्रसन्नतेने पाहात असल्याचे श्रीमहाराजांना दिसले. क्षणभर



त्या दिव्य दर्शनाने त्यांचे डोळे आनंदाने भरून आले. दुसऱ्या दिवशी जवळपासची फुले आणून त्यांनी भगवंताची पूजा बांधली.

त्या दिवशी तुकाराम नावाचा भाविक मंदिरात दर्शनासाठी आला. त्याच्याकडून समजले की त्या मंदिरात एक गोसावी राहात होता. नुकताच त्याने देह-त्याग केला होता. श्रीमहाराजांना कळून चुकले की सर्व साहित्य त्या अज्ञात गोसाव्यानेच ठेवले होते. त्यांनी तुकारामाकरवी जवळपासच्या ब्राह्मणांना बोलावून त्यांच्याकडून शिवाला लघुरुद्राभिषेक केला. त्यांनी उरलेले साहित्य व पैसे त्या तुकारामाला देऊन टाकले. नंतर ते त्या दुर्गम भालचंद्र डोंगरावर जेथे तुकाराम महाराज बसत असत तेथे जाऊन ध्यान लावून बसले. रात्री वाघाची डरकाळी ऐकू आली, परंतु तो दुसरीकडे निघून गेला. तिसऱ्या दिवशी दुपारी एक त्रिशूलधारी अवधूत प्रकट झाला. त्याने सांगितले की, "सर्व योगाची परिणती मीच आहे, मीच विश्वात भरून राहिलो आहे, माझ्याशिवाय या जगात दुसरा कोणी नाही, अशी अनुभूती मिळाल्यावर काहीही वेगळे उरत नाही. तेव्हा असे भटकण्यापासून काय फायदा? आता येथून निघून जा," असे म्हणून तो अदृश्य झाला.

तेथे दुसरा एक डोंगर आहे. त्यावर तुकाराम महाराज यांच्या पादुका आहेत. दर्शन करून श्रीमहाराज देहूला परत आले. तेथे प्रल्हाद नावाचा भक्त त्याना घरी घेऊन गेला. त्याची सुस्वरूप दुसरी बायको उच्छृंखलपणे वागून श्रीमहाराजांची बडदास्त करू लागली, म्हणून श्रीमहाराज दुपारचे भोजन घेताच चिंचवडला निघाले.

भगवंताच्या आज्ञेप्रमाणे श्रीमहाराज देहूहून निघाले. ते चिंचवडला आले. महान गणेश-उपासक मोरया गोसावी यांच्या समाधीचे दर्शन घेतले आणि ते सभा मंडपात बसले. एका ओळखीच्या गृहस्थाने त्याना पाहिले आणि पुण्याला आईसाहेबांचेकडे बातमी कळविली. तसेच देवस्थानचा उत्तराधिकारी यानाही माहिती दिली. त्यानी श्रीमहाराजांचे आदरातिथ्य केले. बातमी मिळताच दुसऱ्या दिवशी आईसाहेब श्रीमहाराजांना घेऊन जाण्यासाठी आल्या.

सरोवर सुकून गेल्यावर पाखरे उडून जातात. श्रीमहाराजांच्याकडे जोपर्यंत पैसा होता, तोपर्यंत नातेवाईक मंडळी घरात असत. पण जेव्हा टंचाई आली तेव्हा

भोजनभाऊ हळूहळू निघून गेले. काशीहून परत आल्यावर घरात श्रीमहाराज व आईसाहेब असे दोघेजणच उरले. श्रीमहाराज नेहमी आत्मानंदात गढून गेलेले असत. सकाळी अकरा वाजेपर्यंत अंथरूण सोडत नसत. लोक दुरावले. संसारिक उपाधी पळून गेल्या, असे मानून श्रीमहाराज निश्चिंत झाले, परंतु घर कसे चालायचे ? त्याची जबाबदारी आईसाहेबांचेवर होती. त्यांना टंचाई जाणवू लागली की त्या टोचून बोलू लागत. शेवटी श्रीमहाराजांनी घर विकून टाकले व पैसे आईसाहेबांना दिले, परंतु त्यांना काटकसर करणे माहीत नव्हते. त्या सणवार आणि दान-धर्म उदारपणे करीत असत. गरज पडली की त्या आपला एखादा दागिना विकून काम भागवीत असत. अगदीच हात अखडला तर कधी त्या श्रीमहाराजांना टोमणा मारीत की याना म्हातारचळ लागले आहे आता.

**सब के दाता राम**

श्रीमहाराजांना सद्‌गुरू स्वामी समर्थांचा अनुग्रह प्राप्त झाल्यानंतर विरक्ती आली. तरीही ते गृहस्थ होते आणि प्रपंच चालविण्यासाठी पुन्हा सुगंधीचा धंदा व्यवसाय करू लागले. दिवाळीपूर्वी गिऱ्हाइके मोठ्या आनंदाने माल घेत असत. सन १८९६ मध्ये श्रीमहाराज जी अत्तरे मुंबईला घेऊन गेले होते, ती लवकर संपली. पुण्याहून मागविलेला माल वेळेवर आला नाही, म्हणून उरलेला माल विकून त्यांनी पुण्याला जायचे ठरविले. सकाळी जेव्हा पेटी उघडली तेव्हा सर्व बाटल्या भरलेल्या होत्या. ते चकित झाले. त्यांनी सर्व अत्तरे विकली. दुसऱ्या दिवशी पाहिले तर पुन्हा बाटल्या भरलेल्या. त्यांनी विचार केला की जो मोकळ्या बाटल्या भरून टाकतो, तो घर बसल्या आमची उपेक्षा करील काय ?

अजगर करी न चाकरी, पक्षी करी न काम ।
दास मलूक म्हणतो, सर्वांचा दाता राम ॥

आणि तेव्हापासून त्यांनी पैसा मिळविण्यासाठी कोणतेही काम करायचे नाही, असा संकल्प केला व तो पुढे १७ वर्षे म्हणजेच जन्मभर पाळला.

**संतत्वाची ओळख**

सर्व ओळखीचे लोक श्रीमहाराजांना अजुनी रामभाऊ गंधी या नावानेच जाणत होते. त्यांच्या संतत्वाची ओळख फार कमी लोकांना होती. श्रीमहाराजांना



काशीमध्ये जे पांडुरंगभट भडकमकरशास्त्री भेटले होते आणि ज्यांना काशी-विश्वनाथाने स्वप्नात येऊन सांगितले होते की तुझ्या वरच्या मजल्यावर मी राहातो, तिथे शिवामूठ दिल्यास मला अर्पण होईल; ते भडकमकरशास्त्री ठाण्याला येऊन राहिले होते. श्रीमहाराजांचा अनुग्रह मिळूनही अजुनी त्यांच्यामध्ये कर्मठता होती. ते वेद पठण करीत. दररोज भगवान शिवाला अभिषेक करीत. एके दिवशी ठाण्यामध्ये श्रीमहाराज बाहेर पडले होते, एवढ्यात योगायोगाने भडकमकरशास्त्री पाण्याच्या घागरी भरून तेथे आले. श्रीमहाराजांना पाहाताच त्यांनी हातातल्या घागरी खाली ठेवल्या व त्यांच्या चरणी लोटांगण घातले. ते पाहून इतर लोकांना श्रीमहाराज हे सत्पुरुष आहेत याची जाणीव झाली.

**पुण्यात प्लेग**

१८९६ साली पुण्यात प्लेगचा कहर झाला. संसर्गजन्य रोग असल्यामुळे आजाऱ्यांना हॉस्पिटलमध्ये भरती करावे असा हुकूम झाला. इंग्रज शिपाई घराघराची तपासणी करू लागले. त्यामुळे पुण्याला दहशत बसली होती. इंग्रज शिपाई बूट घालून घरात घुसतात, हे श्रीमहाराजांना पसंत नव्हते, म्हणून ते आले की टेंपल, गॉड, कुकिंग रूम असे म्हणून ते शिपायांना पिटाळून लावत. श्रीमहाराजांवर विनाकारण जळफळणारे शेजारी इंग्रज शिपायांना मुद्दामहून श्रीमहाराजांचे घर दाखवीत. एके दिवशी एक मुर्दाड शिपाई त्यांच्या घरात घुसला. श्रीमहाराजांनी त्याला थोपविण्याचा प्रयत्न केला, तेव्हा त्याने त्यांना मारण्यासाठी हात उगारला. त्यांनी आपले मस्तक पुढे केले. तो परतण्यासाठी फिरला तेव्हा पायरीवरून पाय घसरून पडला आणि त्याच्या पायाची हाडे मोडली. त्याने जाऊन प्लेग ऑफिसरकडे तक्रार केली. तेव्हा त्याने राग काढला की तू टेंपल म्हटल्यावर आत का गेला होतास ?

**सप्तशृंगी यात्रा**

प्लेगच्या साथीमध्ये शिपायांचा त्रास नको म्हणून श्रीमहाराज सप्तशृंगीला जायला निघाले. तेथे त्यांना श्रीसदानंद महाराज हे गुरुबंधू भेटले. त्यांना "हुपस्वामी" असेही म्हणत. ते सिद्धयोगी होते.

सप्तशृंगी गडावर "शितखडा" या नावाचे स्थान आहे. तेथे डोंगराचे

तुटलेले कडे आहेत व खाली खोल दरी आहे. पूर्वीच्या काळी लोक आपला नवस फेडण्यासाठी त्या जागेवरून खाली उडी घेत. त्यात जीव जाण्याचा धोका असे. श्रीमहाराज हुपस्वामींच्याबरोबर बोलतबोलत त्या ठिकाणी पोहोचले. ते एक रमणीय स्थान आहे. हुपस्वामी गंमतीने म्हणाले की, "भाऊसाहेब, तुम्ही येथून उडी घ्याल का?" श्रीमहाराज म्हणाले की, "मी एकटाच काय तुम्हाला घेऊन उडी मारतो." हुपस्वामी म्हणाले, "उडी माराल पण जिवंत राहाल काय ?" श्रीमहाराजांनी कोणताही विचार न करता हुपस्वामींचा हात धरून डोळा लवतो न लवतो एवढ्यात खाली उडी मारली. हुपस्वामी सद्गुरूंचे स्मरण करून ओरडले. दोघेही सुखरूप खाली आले. तेव्हा स्वामी म्हणाले की, "हे कसले राक्षसी कृत्य ? भाऊसाहेब, आम्ही तुमच्यापुढे तुच्छ आहोत."

**प्लेगची गाठ**

सप्तशृंगी गडावरून आल्यावर श्रीमहाराजांनी आपले कसबा पेठेतील घर विकले आणि ते शुक्रवार पेठेत गळलिमकर यांच्या घरी भाड्याने राहू लागले.

तेथे आल्यापासून श्रीमहाराजांची तब्येत फारच बिघडली. पांडुरंगभटांच्या-मुळे श्रीमहाराज मुन्सीफ भागवत यांच्या घरी ठाण्याला वारंवार जात असत. मुन्सीफ भागवतांचा मुलगा बळवंतराव भागवत श्रीमहाराजांना हवापालट म्हणून ठाण्याला आपल्या घरी घेऊन गेला. ठाणे-मुंबई इथल्या डॉक्टरांनी उपचार करून पाहिला. पण काहीही उपयोग झाला नाही. डॉक्टर म्हणत होते की, "आता हे काही दिवसांचेच पाहुणे आहेत." शेवटी श्रीमहाराजांनी औषध घेणे बंद केले. एके दिवशी त्यांना फार ताप आला. ते म्हणाले, "दुपारी मला थोडे ताजे ताक देत राहा." आणि आठ दिवसांनी त्यांच्या जांघेमध्ये आंब्याएवढी गाठ आली. ती त्यांनी दाखविली. ती फुटून त्यातून रक्त-पू वाहून गेला आणि ते बरे झाले. ते म्हणाले, "तुम्हा लोकांना पूर्वीच सांगितले असते, तर तुम्ही घाबरला असता आणि कायकाय औषधे पाजविली असती, ते कोणास ठाऊक ?"

आपले घर विकून गळलिमकर यांच्या घरात भाड्याने राहिल्यावर श्रीमहाराजांनी स्वत:ला देह प्रारब्धावर सोपविले आणि ते सर्व दिवस पडून राहू लागले. जवळ पानाचे सामान, पितळेचा खलबत्ता, पिकदाणी, पाण्याने भरलेला



तांब्या ठेवलेला असे. ठाण्याहून बळवंतराव भागवत व पांडुरंगभट हे वारंवार येत असत. त्यांच्या निमित्ताने आणखी काही लोक येऊ लागले, तेव्हा उपाधी वाढू लागली. पैसा कुठून आणायचा ? या लोकांपासून दूर राहाण्यासाठी श्रीमहाराज उग्र रूप धारण करू लागले. प्रेम-भक्ती नसणाऱ्या लोकांवर ते उसळत असत. त्यांच्यावर शिव्यांचा भडिमार करू लागत. मग ते लोक त्यांना वेडा म्हातारा समजून दूर होत असत.

**साधु-संतांचा ठाव**

श्रीमहाराजांची तब्येत वारंवार बिघडे. ते आजारी पडले की बळवंतराव भागवत हे ठाण्याहून बातमी मिळाली नसताना आपोआप येत आणि त्यांची सेवा, औषध-पाणी करून ते बरे झाल्यावर परत जात. भागवतांचे बरोबर भाऊ, मित्र, नातेवाईक अशी मंडळीसुद्धा येऊ लागली. कोणतीही मिळकत नव्हती आणि खर्च वाढत होता. तरीही श्रीमहाराजांच्या घरात कसे चालायचे, हे समजत नसे. बळवंतराव भागवत यांनाही हे रहस्य वाटायचे.

लोक आल्यावर रोजचा खर्च वाढायचा. प्रपंचाला काय लागत नाही ? बळवंतराव गरजेच्या वस्तूंची यादी करून श्रीमहाराजांच्यापुढे ठेवीत तेव्हा ते पैसे गादीखालून घेण्यास सांगत. गादीखाली गरजेपुरते पैसे मिळत. बळवंतरावांच्या मनात प्रश्न येई की गादीखाली पैसे कुठून येतात ? एके दिवशी त्यांनी छडा लावायचे ठरविले. श्रीमहाराज उठल्यावर आत गेले, तेव्हा बळवंतरावांनी बैठक झाडून झटकून साफ केली. श्रीमहाराज परत आल्यावर बळवंतरावांनी सामानाची यादी त्यांच्यासमोर ठेवली. तेव्हा श्रीमहाराज म्हणाले की, "गादीखालून घे!" बलवंतराव म्हणाले, "पैसे नाहीत. मी आत्ताच साफसफाई केली आहे." तेव्हा श्रीमहाराज म्हणाले, "पुन्हा बघ." पाहिले तर गादीखाली गरजेचे पैसे मिळाले.

दत्तोपंत निरोखेकर यांनाही असाच अनुभव आला. श्रीमहाराजांच्या गालिचाखाली गरजेपुरते पैसे मिळत असत. नव्या घरात आल्यावर "अनन्याश्चिंतयन्तो" या वचनाचा अनुभव मिळू लागला. जितक्या पैशांची गरज असे, तितके पैसे एखादा भक्त श्रीमहाराजांच्यासमोर ठेवून जात असे. बाजारातून खरेदीचे काम दत्तोपंत निरोखेकरांकडे होते. दुसऱ्या दिवशी पंधरा

रुपयांची गरज होती. इकडे घरात दोन आणेसुद्धा नव्हते. काय करायचे? परंतु दुसऱ्या दिवशी श्रीमहाराज जागे होत आहेत, एवढ्यात जरीचे फेटे बांधलेले दोन गृहस्थ आले आणि त्यांनी श्रीमहाराजांसमोर १५ रुपये अर्पण केले.

श्रीमहाराज म्हणत की, "साधु-संतांचा ठाव देवादिकांनासुद्धा लागत नाही."

**देहाची माया**

बळवंतरावांना काही अडचण आली तर एखाद्या मंदिरात निग्रहाने जाऊन बसत. तेथील देवाचा दृष्टांत होई की, "तुझे काम येथे होणार नाही. तू पुण्यास जा." एकदा ते पुण्यातील विठ्ठलवाडीच्या गणेश मंदिरात जाऊन दोन दिवस बसले. जोपर्यंत काम होत नाही, तोपर्यंत येथून जाणार नाही, असा त्यांनी निश्चय केला. गणेशाने स्वप्नात येऊन सांगितले की, "तुझे काम येथे होणार नाही. तू पुण्यास जा." तरीही ते अडून बसले, तेव्हा असंख्य उंदीर पैदा झाले आणि त्यांना चावू लागले. शेवटी ते श्रीमहाराजांकडे गेले. त्यांनी विचारले तेव्हा खोटेच सांगितले की, "मी ठाण्याहून आलो आहे." श्रीमहाराज म्हणाले, "नास्तिकाला आस्तिक बनविणे फार मुष्किलीचे आहे. त्याला उंदीरही पळवून लावतात." शेवटी बळवंतरावांनी मान्य करीत म्हटले की, "आपल्या परीक्षेस आम्ही उतरणार नाही. आपल्या सहवासामुळे काही करावे, अशी ईर्ष्या वाटते, परंतु देह-ममता सुटत नाही" आणि सर्व गोष्टी सांगून स्वत:ची चूक कबूल केली. तेव्हा श्रीमहाराज म्हणाले, "शरीराची ममता दुस्तर असते. निश्चयाने व प्रेमाने भगवंताचे ध्यान केल्यावर धैर्य वाढते. अभ्यासामुळे सर्व जमते, म्हणून प्रयत्न केले पाहिजेत. तेव्हा कुठे मुक्कामाला पोहोचता येते." .

सन १९०२ मध्ये श्रीमहाराज सात-आठ महिने आजारी होते. सेवेसाठी ठाण्याहून बळवंतराव आले होते. आईसाहेबांना प्लेगचा ताप आला. बळवंतरावांनाही प्लेगचा ताप आला. तेव्हा बळवंतराव म्हणाले की, "मी ठाण्याला जातो." श्रीमहाराजांनी त्यांना थांबविण्याचा खूप प्रयत्न केला, परंतु ते हट्ट धरून गेले. श्रीमहाराज म्हणाले, "शेवटी बळवंत परत गेला. त्याचे काही खरे दिसत नाही." तेच खरे ठरले. दोन-तीन दिवसांतच बळवंतरावांचे निधन झाले.



बळवंतरावांनंतर लक्ष्मणराव बापटांना प्लेगच्या तापाने पछाडले. आईसाहेब आजारी होत्याच. श्रीमहाराज मूळव्याधीमुळे हैराण होते. त्यात बापट तापाने पडले. त्यांच्या एका मित्राने सल्ला दिला की घरात आणखी कोणी नाही, तेव्हा बापटांना प्लेगच्या हॉस्पिटलमध्येच ठेवावे, परंतु श्रीमहाराजांनी ठणकावून सांगितले की, "माझी हाडे जोपर्यंत उरली आहेत, तोपर्यंत मी याला मारण्यासाठी हॉस्पिटलमध्ये पाठविणार नाही." आईसाहेब अंथरूणावर आणि श्रीमहाराज आजारी; तरीही ते साबुदाण्याची खीर व शिरा बनवून बापटांना खाऊ घालत. सहाव्या दिवशी त्यांना वायू झाला. वायूचा प्रकोप थांबविण्यासाठी ते बापटांना धरून बसले. जेव्हा बापटांची बायको व नातेवाईक गावाहून परत आले, तेव्हा ते घरी गेले. तेथे त्यांना पुन्हा वायु-प्रकोप झाला. श्रीमहाराज स्वत: त्यांच्या घरी गेले. बापटांना बांधून घातले होते. श्रीमहाराजांनी त्यांना मोकळे करून औषध पाजले आणि त्यांच्या कृपेमुळे बापट वाचले. बापटांच्या निष्ठेमुळे त्यांनी निभावून नेले.

**नवीन घर**

श्रीमहाराज कसबा पेठेतील घर विकून नव्या घरात राहायला आले. १९०३ मध्ये त्यांनी शनिवार पेठेतील मेहेंदळे नावाचा गृहस्थाकडून घर खरेदी घेतले आणि तेथे राहू लागले. तेथे एक शिवालय होते. त्या घरात देवादिकांच्या व साधु-संतांच्या तसबिरी लावल्या. त्या तसबिरींना रोज हार घातले जात. श्रीमहाराज स्वत: हार तयार करीत. फुलांसाठी रतीब होता. एके दिवशी दुपारी बारा वाजले तरी फुले आली नाहीत. तेव्हा कडक उन्हामध्ये श्रीमहाराज अनवाणी फुले आणण्यास गेले. फुले आणली, माळा केल्या आणि त्या तसबिरींना घातल्या. त्या घरात कुल-धर्म, कुलाचार आणि उत्सव मोठ्या थाटाने साजरे होऊ लागले. घर कौलारू होते, छोटे होते. भक्त आल्यावर तिळभरही जागा उरत नसे. त्याच्या पश्चिमेकडील जागा मोकळी होती. तिचे मालक गंगाधर मेहेंदळे यांनी ती जागा श्रीमहाराजांना दान म्हणून देऊन टाकली.

श्रीमहाराज नि:स्पृह होते आणि प्रसिद्धीपासून दूर असत, परंतु त्यांचे साधुत्व ओळखणारे लोक येतच असत. त्या वेळी श्रीमहाराज त्यांना व्यावहारिक, पौराणिक, धार्मिक, आध्यात्मिक इत्यादी विषयांचे रहस्य तासन् तास समजावून

सांगत असत. कधीकधी ते भक्तांच्या मूर्खपणावर खेकसत आणि शिव्यांचा भडिमार करीत. हे खेकसणे लोकांना सुधारण्यासाठीच असे. कधीकधी एखादा दंभी त्यांची परीक्षा घेण्यासाठी येई, त्या वेळी ते त्याच्यावर राग काढत. त्यांचा राग किंवा त्यांच्या शिव्या या भक्तांसाठी आशीर्वाद ठरत.

**शिव्यांचे वरदान**

कल्याणचे भिडे नावाचे गृहस्थ श्रीमहाराजांच्याकडे येत असत. त्यांचा दत्तू नावाचा मुलगा फार दिवसांपासून संग्रहिणीमुळे आजारी होता. हाडांचा नुसता सापळा उरला होता. डॉक्टरांनी हात टेकले. जगण्याची आशा दिसत नव्हती. त्याची आजी गोदूताई केतकर यांनी त्याला श्रीमहाराजांकडे घेऊन जाण्याचे ठरविले. त्याला रेल्वेतून घेऊन एके दिवशी दुपारी त्या श्रीमहाराजांच्यापाशी आल्या. नुकतेच ते जेवण करून पडले होते. गोदूताईंनी त्यांच्या दाराजवळ पेढे, हार व धोतरात गुंडाळलेल्या दत्तूला ठेवले. श्रीमहाराज संतापले, “तू गाढव आहेस, मूर्ख आहेस. तुम्ही बायका दुसऱ्याला बदनाम करणाऱ्या असता. तू थेरडी झालीस, मग अक्कल गेली काय? तुला विश्वास नाही. विश्वास असता तर इथे कशाला आली असतीस? तू या मुलाला आगगाडीत बसवून आणलेस. तू बाल हत्यारी आहेस.” बोचक टोमण्यांचा मारा होत होता, परंतु गोदूताईंची श्रीमहाराजांचेवर पूर्ण निष्ठा होती. त्या त्यांचा राग सोसत राहिल्या. शेवटी श्रीमहाराज गप्प झाले.

श्रीमहाराजांची कृपा-दृष्टी पडताच थंड पडलेल्या मुलाच्या अंगात उब येऊ लागली व त्याला गाढ झोप आली. गोदूताईंनी श्रीमहाराजांचे स्मरण करून अंगारा त्याच्या कपाळी लावला. संध्याकाळपर्यंत मुलगा बरा झाला. श्रीमहाराजांच्या शिव्या त्या मुलासाठी वरदान ठरल्या.

**मेहेंदळ्यांची जागा परत**

मेहेंदळ्यांनी श्रीमहाराजांना कागद लिहून बखळ दिली होती, या गोष्टींची त्यांना घमेंड होती. कधीकधी ते श्रीमहाराजांच्याकडे येऊन तर्क-वितर्क करीत बसत. त्यांना वाटत होते की जागा दान दिली आहे, तेव्हा हे दबून वागतील. परंतु श्रीमहाराज हे स्पष्टवक्ते होते. मेहेंदळे हे उलटसुलट गोष्टी बोलून आपला प्रभाव पाडू इच्छित असत. एकदा ते म्हणाले की, “ब्राह्मणांना वेदांत शास्त्र हे क्षत्रियांनी



शिकविले.” श्रीमहाराज म्हणाले की, “तुमची बीजे अशुद्ध आहेत, त्यामुळे असे तर्क-कुतर्क सुचतात.” हे ऐकून मेहेंदळ्यांना अपमान वाटला आणि त्यांनी श्रीमहाराजांना धडा शिकवायचे ठरविले. त्यांनी दिलेले दान-पत्र रजिस्टर केले नव्हते. हा मुद्दा घेऊन ते कोर्टात गेले. प्रकरण हायकोर्टापर्यंत गेले. मेहेंदळे यांचा दावा कायद्याने सिद्ध झाला. त्यांना जागा परत करण्याचा फैसला झाला. लोकांना मेहेंदळ्यांचे वागणे बरे वाटले नाही, परंतु मेहेंदळ्यांना सूड घेतल्याचा आनंद झाला. मात्र श्रीमहाराजांना थोडीही निराशा वाटली नाही.

एका भक्ताने विचारले की, “आपल्याजवळ कर्तुमकर्तुम् शक्ती आहे. मग विरुद्ध पक्षाला धडा का देत नाही?” तेव्हा श्रीमहाराज म्हणाले, “मी आपल्या जीवनात उत्तमोत्तम सुखे भोगली आहेत. उत्कृष्ट कलाकार, राजा-महाराजा यांची संगत मिळविली आहे. सुखोपभोगासाठी पैसा कमविण्याचा लोभ होता. त्या नादात खूप कष्ट झेलले. हिमालयात जाऊन तपस्या केली. एका फकिराकडून किमया शिकून घेतली, परंतु चैन पडत नव्हते. सद्गुरू श्रीस्वामी समर्थ यांच्याजवळ गेल्यावर समाधान वाटले. देहाची ममता सुटावी म्हणून काळजी न करता बेधडकपणे मगरींनी भरलेल्या डोहात उडी घेतली, डोंगरावरून उडी मारली, आपल्याजवळील सिद्धींची पारख करण्याचा प्रयत्न केला. जेव्हा असे पाहिले की यामुळे अहंकार वाढत आहे, तेव्हा त्या सोडून दिल्या आणि आता देह-प्रारब्ध भोगत जीवन घालवीत आहे. मेहेंदळ्यांनी जागा परत घेतली, याचे मला दु:ख वाटत नाही. येथे धर्मशाळेची गरज काय आहे? अनेक लोकांनी मंदिरे बांधली, आता तेथे पाकोळ्या राहातात. धर्मशाळा बनविल्या, त्या उध्वस्त झाल्या आहेत, म्हणून या भानगडीत पडण्याची आता गरज वाटत नाही.”

**संतांना सतावण्याचे वाईट फळ**

गल्लीत राहाणारे लोक विनाकारण श्रीमहाराजांवर जळफळत होते. त्यांनी काही पोरांना भडकावून श्रीमहाराजांना त्रास देण्याचा चंग बांधला. घाणेरड्या शिव्या देणे, बोंबा मारणे, घरात धूळ फेकणे, टिंगल करणे, दरवाज्यावर दगड मारणे, असे उद्योग करीत ते श्रीमहाराजांना त्रास देऊन भडकाविण्याचा प्रयत्न करू लागले, परंतु श्रीमहाराज जरासुद्धा ढळले नाहीत. एके दिवशी काही बदमाश घरात घुसले. आरडाओरडा करू लागले. श्रीमहाराजांना त्यांनी शिव्या दिल्या.

दिवा विझविला. बाहेरची माती-कचरा आणून घरात फेकला आणि ते निघून गेले. श्रीमहाराजांनी त्यांना थांबविले नाही आणि संतापही दाखविला नाही. ते शांतपणे पाहात राहिले. तक्रार नव्हती की तिरस्कार नव्हता. परंतु आईसाहेबांना राग आला. त्या म्हणाल्या की, "माझ्या घरातील दिवा ज्यांनी विझविला, त्यांना भगवंत पाहून घेईल." पुढे त्या मस्तवाल लोकांचे जे पुढारी होते त्यांची दुर्दशा झाली, कुणी प्लेगला बळी पडला, कोणी जन्माचा आजारी पडला, तर कुणी इंग्रजांच्याविरुद्ध कारस्थान करण्याच्या गुन्ह्यामध्ये सापडून तुरुंगात सडत पडला. संताला त्रास दिल्यामुळे ते बरबाद झाले.

**व्यावसायिक सावधगिरी**

बळवंतराव भागवत व भडकमकरभट निवर्तल्यावर वासुअण्णा भागवत आणि त्यांचे मेहुणे अच्युतराव पानवळकर हे आलटून-पालटून येऊन सेवेसाठी दोनदोन दिवस राहात असत. दैनिक व उत्सव-सणावाराचा बाजार त्यांनाच करावा लागे. श्रीमहाराज माल पारखून घेत, किंमत विचारीत, हिशोब पाहात आणि काही ना काही दोष काढून त्या लोकांच्यावर रागाने तुटून पडत. इतके की त्यांना रडवीत असत. कधी त्या लोकांना वाटे की पै-पैचा हिशोब ठेवण्यासाठी आम्ही येथे राहिलो आहोत काय? त्यांच्या मनातील गोष्ट ओळखून श्रीमहाराज म्हणत की, "व्यवहारात सावध असले पाहिजे. तुम्ही माझा आश्रय घेतला आहे. मी लाखो रुपये उडवून शांतपणे बसलो आहे. व्यवहारामध्ये तुमचे पुरते लक्ष असले पाहिजे. हेच लक्ष पालटून परमार्थामध्ये सहजपणे लावता येते."

**श्रीमहाराजांचे वात्सल्य**

श्रीमहाराज आपल्या लोकांवर पुत्रवत प्रेम करीत असत. ते प्रत्येक दिवशी लोकांना बोलता-बोलता जीवनाचे रहस्य समजावून सांगत. त्यांच्या खाण्या-पिण्याची काळजी घेत. आजारी असल्यास लक्ष देत. संकटांचे प्रसंगी त्यांचे रक्षण करीत. रात्री झोपण्यापूर्वी बघत असत की सर्वांना अंथरूण-पांघरूण मिळाले आहे की नाही. नसले तर स्वत:च्या खांद्यावरील शाल त्याला पांघरत. ते खऱ्या अर्थाने गुरुमाऊली होते. ते भक्तांचे लौकिक व पारमार्थिक कल्याण होण्यासाठी काळजी घेत.

* * *



# १०. नाशिकचे दत्तमंदिर

नाशिकचे विष्णुपंत स्मार्त हे श्रीबीडकर महाराज यांचे शिष्य होते. ते पेन्शनर होते. त्यांचे मित्र होते गौतम. त्या दोघांनाही असे वाटत होते की नाशिकात दत्तमंदिर बांधावे आणि म्हातारपणी सेवा करीत राहावे. त्यांनी ते श्रीमहाराजांना सांगितले, तेव्हा श्रीमहाराजांनी अनुमती दिली. विष्णुपंतांना मंदिराचा सर्व खर्च करणे शक्य नव्हते, म्हणून त्यांनी वर्गणी गोळा केली. गौतम यांची काळा राममंदिराजवळ स्वत:ची जागा होती, ती त्यांनी दिली. पण खर्च कसा पूर्ण होणार?

विष्णुपंतांनी पुण्यास येऊन श्रीमहाराजांना खर्चाची अडचण सांगितली. तेव्हा श्रीमहाराजंनी कर्ज काढून मंदिर पूर्ण करण्याची आज्ञा केली. विष्णुपंत स्मार्त यांनी त्यांना नाशिकला येऊन मूर्ती स्थापन करण्याची विनंती केली. श्रीमहाराज नव्या घरात राहाण्यास आल्यापासून कुठे बाहेरगावी जात नसत, परंतु नाशिकला गेले आणि ५-६ महिने तेथे राहून श्रीदत्तजयंती करूनच पुण्यात परत आले.

जेव्हा श्रीमहाराज नाशिकला आले, त्या वेळी स्वागत करून विष्णुपंत स्मार्त म्हणाले की, "हे आपले मंदिर आहे. याचा पूर्ण भार आपल्यावर आहे." तेव्हा श्रीमहाराज म्हणाले की, "दत्ताचे प्रारब्ध दत्ताबरोबर आणि माझे प्रारब्ध माझ्याबरोबर!" मंदिराच्या वरच्या मजल्यावर जाऊन त्यांनी मुक्काम टाकला.

श्रीमहाराज नाशिकला आल्यामुळे भक्तजन तेथे येऊ लागले. याच वेळी नाशिकचा कुंभमेळा आला. महाराजांची प्रसिद्धी वाढू लागली आणि मोठ्या संख्येने लोक दर्शनासाठी येऊ लागले. जे काही अर्पण होत असे, ते सर्व श्रीमहाराज विष्णुपंत स्मार्त यांच्या हवाली करीत. श्रीमहाराजांनी पुण्याहून येताना २५ रुपये. आणले होते. रोज मोठ्या संख्येने प्रसादासाठी लोक येऊ लागले, परंतु श्रीमहाराजांच्या कृपेमुळे कधीही उणीव भासली नाही. सर्व सण-उत्सव मोठ्या

थाटाने झाले. जे कर्ज चढले होते तेही चुकते केले गेले. दत्तजयंती करून श्रीमहाराज पुण्याला निघाले तेव्हा त्यांच्याजवळ २५ रुपयेच होते.

नाशिकचे दत्तमंदिर तयार झाले, पण आता त्याच्या व्यवस्थेची काळजी लागली. विष्णुपंत हे वयोवृद्ध झाले होते. त्यांनी विचारले की, “माझ्यानंतर मंदिराची व्यवस्था कशी ठेवायची?” श्रीमहाराजांचे प्रमुख शिष्य तेथे हजर होते. त्यांनी सर्वांना विचारले की, “नाशिकचे मंदिर कोण सांभाळणार?” कोणी पुढे आले नाही. तेव्हा विष्णुपंतांचे जामात दामोदर त्रिंबक देशपांडे पुढे आले आणि म्हणाले, “आपली आज्ञा असेल तर करीन.” श्रीमहाराजांनी त्यांना जवळ बसवून घेतले आणि पुत्र मानून त्यांच्या तोंडात स्वत: साखर घातली. त्यांचे नाव एकनाथ रामचंद्र बीडकर असे ठेवले आणि तेसुद्धा स्वत:ला एकनाथ बीडकर म्हणवू लागले.

दामोदर देशपांडे हे आईला भेटण्यास फलटणला गेले होते. त्या दरम्यान श्रीमहाराज समाधिस्थ झाले. कुणीही त्यांना कळविले नाही. वर्तमानपत्रात वाचल्यावर त्यांना समजले. ते निघून पुण्याला आले, मात्र त्यांची उपेक्षा झाली. ते फलटणला जाऊन नोकरी शोधू लागले. नोकरी मिळत असे. पण लोक तक्रार करीत की हा खोटे नाव लावतो. ती सुटत असे. तेव्हा ते कंटाळून एकनाथांच्या पैठणला गेले. तेथे श्रीमहाराजांनी स्वप्न दृष्टांत दिला की, “तू नाशिकला जा.” ते तेथे गेल्याने विष्णुपंत स्मार्त याना आनंद झाला. त्याना तेथे नोकरीही मिळाली. त्यानी नाशिकच्या मंदिरातील पूजा-पाठ याची जबाबदारी सांभाळली. विष्णुपंत स्मार्त यानी मंदिर व सर्व वस्तू दामोदर देशपांडे यांचे नावे करून दिल्या. श्रीमहाराजांचे नाव त्यांना लावता आले नाही कारण काही लोकांनी हरकत घेतली. परंतु देशपांड्यांनी स्वत:ला श्रीमहाराजांचा वारस मानले. ते महाराजांचे गोत्र लावून त्यांच्या कुलाचारांचे पालन करीत होते.

काही दिवसांनंतर विष्णुपंत स्मार्त व त्याची पत्नी यांचे निधन झाले. तेव्हा देशपांडे फलटणला जाऊन आपल्या आई-बहिणींना घेऊन आले. दुर्दैवाने त्यांची पत्नी (विष्णुपंतांची मुलगी) वारली. तेव्हा त्यानी गृहस्थाश्रमाचे पालन होण्यासाठी व मंदिराची परंपरा चालू राहाण्यासाठी दुसरे लग्न केले. ते मंदिरातील



नित्य-नैमित्तिक पूजा-पाठ यासारखे कार्य यथासांग करू लागले. त्यांची बदली अहमदनगरला झाली. तेव्हा त्यांनी एकाला ती जबाबदारी सोपवून आपले कर्तव्य पूर्ण केले. शेवटी पेन्शन घेऊन ते नाशिकला आले. त्यांनी दत्तमंदिराचा ट्रस्ट बनविला.

दामोदर देशपांडे यांनी आपले कर्तव्य पूर्ण करून सन १९६९ मध्ये देहत्याग केला. त्यांचे चिरंजीव डॉ. दिनकर पवईला आय. आय.टी. मध्ये नोकरी करीत होते. आता ते पेन्शन घेऊन नाशिकला आले आहेत व मठ-मंदिराची सेवा करीत आहेत.

* * *

## श्रीबीडकर महाराज यांची भविष्यवाणी

१. श्रीमहाराजांना एक भक्ताने विचारले की, “देशाच्या स्वतंत्र्यासाठी साधु-संत मदत करीत नाहीत. मग आपला देश कधी स्वतंत्र होणे शक्य आहे का? होणार असेल तर केव्हा आणि कसा?”

तेव्हा श्रीमहाराजांनी विसाव्या शतकाच्या सुरवातीलाच सांगितले की, “हे इंग्रज लोक फटाका न वाजताच हिंदुस्तान सोडून निघून जातील. हीच आमची मदत समजा.” ही भविष्यवाणी खरी ठरली.

✻

२. श्रीमहाराजांनी त्या वेळी दुसरी भविष्यवाणी केली होती की, “इंग्रज आमच्या आपलेपणाबरोबर धन, संपत्ती व वैभव हिरावून घेऊन गेले, तरी आपण कधी ना कधी ते परत मिळवू शकू. परंतुया इंग्रजी राज्यात आपली दानत (सत्यनिष्ठा) अर्थात आर्यसंस्कृती गेली, तर ती परत मिळविणे अशक्य आहे.”

आपण आज या भविष्यवाणीचा अनुभव घेत आहोत.

# ११. अभिन्न पतिव्रता : आईसाहेब

सौ. जानकीबाई आईसाहेब या श्रीबीडकर महाराजांच्या जन्मभर खऱ्या अनुगामिनी राहिल्या होत्या. त्या संपन्न घराण्यातून आल्या होत्या. त्या धार्मिक व श्रद्धाळू होत्या. बीडकर घराण्यात आल्यावर आपल्या सासूंच्या व पतीच्या आवडत्या बनल्या.

श्रीमहाराजांची राहणी संपत्ती मिळेल तशी बदलत गेली, परंतु त्यांनी आपला प्रपंच सांभाळत पतीच्या इच्छेनुसार त्याना साथ केली. श्रीमहाराज हे कधी व्यापाराच्या निमित्ताने तर कधी विलासाच्या आकर्षणामध्ये बुडून जात, परंतु आईसाहेबांनी भांडण तंटा केला नाही. त्या गृहस्थ-धर्माचे पालन करण्यामध्ये व धर्म-कर्माच्या गोष्टीमध्ये गर्क होत असत.

श्रीमहाराज सद्गुरूंचे कृपा-पात्र झाल्यावर संसारापासून विरक्त झाले. त्यांनी स्वत:ला देह-प्रारब्धावर सोडून दिले. तेव्हा घरात टंचाईचे चटके बसू लागले. मग आईसाहेब अधूनमधून आपल्या पतीच्या नाकर्तेपणावर संतापत. तरीही त्यांनी प्रपंच निभावून नेला.

आईसाहेबांना तीर्थ-यात्रा फार आवडत. श्रीमहाराज जेव्हा त्यांना तीर्थयात्रेसाठी नेत, तेव्हा त्यांना आनंद वाटे. घरातील सणवार, धार्मिक उत्सव, हे त्या मोठ्या आनंदाने साजरे करीत.

पुत्र-प्राप्ती न झाल्यामुळे त्या दु:खी असत. एखादे मूल दत्तक घेण्यासाठी त्या तळमळत असत, परंतु श्रीमहाराजांनी कुणालाही दत्तक घेतले नाही. वामन नारायण बिबीकर या मुलास श्रीमहाराज घरी घेऊन आले होते, परंतु तो अवेळी वारला. आईसाहेबांनी श्रीमहाराजांच्या शिष्यांना व भक्तांनाच आपली मुले मानून आपल्या वात्सल्याचा वर्षाव त्यांच्यावर केला.

आईसाहेबांचे जीवन श्रीमहाराजांचे चरणी समर्पित झाले होते. त्यांचे



श्रीमहाराजांवर जिवापाड प्रेम होते. श्रीमहाराज जेव्हा न सांगता घरातून निघून जात तेव्हा त्यांना चैन पडत नसे. श्रीमहाराज अचानकपणे नर्मदा-परिक्रमेस निघून गेले, तेव्हा त्यांचा तपास करीत त्या ओंकारेश्वरला गेल्या आणि त्यांचा पाठलाग करीत परिक्रमेच्या मार्गावर जाऊ लागल्या. फत्तरगीर गोसावी, टेकडीवरचा गोसावी, इत्यादी लोकांनी समजूत काढल्यावर त्या परत येऊन त्यांची वाट पाहात राहिल्या. श्रीमहाराज परिक्रमा आटोपून ओंकारेश्वरला आल्याची बातमी येताच त्या ओंकारेश्वरला गेल्या आणि त्यांना घरी घेऊन आल्या. तसेच जेव्हा श्रीमहाराज न सांगता आळंदी-देहूस गेले, तेव्हा बातमी कळताच चिंचवडला गेल्या आणि त्यांना घेऊन आल्या.

कधीकधी रोज त्या श्रीमहाराजांशी भांडत. एकदा रुसून देवळात जाऊन बसल्या. श्रीमहाराजांनी काकासाहेब निरोखेकर यांना पाठवून बोलावले. त्या आल्या नाहीत. जेव्हा त्यांनी निरोप पाठविला की, “तुम्ही आला नाहीत तर मीच तुम्हाला न्यायला येईन.” ते ऐकताच त्या लगबगीने उठून म्हणाल्या, “नको, नको. या कडकडत्या उन्हात त्यांचे पाय भाजतील. मीच येते.” त्या लगेच परत आल्या.

आईसाहेब या भगवान विठ्ठल-रुक्मिणीच्या भक्त होत्या. या अनन्य भक्तीमुळे त्या स्वत:च अधिकारिणी झाल्या होत्या. श्रीमहाराजांसमवेत नाशिकला रेल्वेने जाताना त्यांच्या डब्यात काळा-सावळा एक धिप्पाड माणूस श्रीमहाराजांना भेटण्यास आला. त्यांनी विचारले की, “काय काम आहे, बाबा?” तो म्हणाला, “मी आपल्याला भेटायला दौंडहून आलो आहे.” ते म्हणाले, “ठीक आहे. ये.” परंतु तो म्हणाला की, “मी मागच्या डब्यात बसतो. आपणांस नंतर भेटेन.” तो निघाला तर आईसाहेबांनी त्याला नमस्कार केला. एका भक्ताने विचारले की, “तुम्ही कोणाला नमस्कार केलात?” तेव्हा त्या म्हणाल्या, “विठ्ठलाला.” लोकांनी शोध घेतला. गर्दी नव्हती, परंतु तो दिसला नाही. प्रत्यक्ष भगवान विठ्ठल दर्शन देण्यास आला होता आणि आईसाहेबांनी त्याला ओळखून नमस्कार केला होता.

आईसाहेबांनी आपल्या आत्मधुंद फकीर बनलेल्या पतीचा संसार जन्मभर निष्ठेने सांभाळला. त्या पतिव्रता आर्य स्त्रीच्या आदर्श होत्या. सौभाग्य असताना श्रीमहाराजांच्या पूर्वीच श्रावण शुद्ध षष्ठी, शक १८३३ (सन १९११) रोजी

विषमज्वराने परलोकी गेल्या. त्यांचा अंत्यसंस्कार श्रीमहाराजांचे उत्तराधिकारी आण्णासाहेब बहुतुले यांनी केला.

श्रीसद्‌गुरू वासुदेवानंत सरस्वती ऊर्फ श्रीबाबा महाराज सहस्रबुद्धे हे बीडकर महाराजांचे शिष्योत्तम होते. श्रीमहाराजांनी आपला आध्यात्मिक ठेवा श्रीबाबा महाराजांना दिला होता. बाबा महाराज हे आईसाहेबांना प्रत्यक्ष आपली जन्मदात्री आई मानत असत. त्यांनी देह-त्याग केला, तेव्हा बाबा पुण्यात नव्हते. त्यांना पत्राने कळविले. तेव्हा ते आईसाहेब गेल्याच्या दहाव्या दिवशी पुण्यात पोहोचले. आईसाहेब गेल्यामुळे श्रीबाबा महाराज इतके दुःखी झाले होते की त्या दुःखामुळे गप्पगप्प राहिले. आईसाहेबांना तिलांजली देऊन लोक जेव्हा परत आले, तेव्हा बीडकर महाराजांनी सर्वांना जेवून घेण्यास सांगितले. श्रीबाबांना जेवायला सांगितले. तेव्हा ते म्हणाले, "आपण आत्ताच्या आत्ता आईसाहेबांचे दर्शन घडवा, तरच मी जेवण घेईन." श्रीबीडकर महाराजांनी तऱ्हेतऱ्हेने समजावून सांगितले, परंतु त्यांनी मान्य केले नाही. शेवटी श्रीमहाराज संतापले, शिव्यांचा भडिमार करू लागले. ते रागावून म्हणाले, "मूर्खा, मेलेला माणूस परत येत नाही, एवढी अक्कलसुद्धा तुला नाही?" तरीही बाबा हट्ट धरून बसले. श्रीमहाराज रागावण्याबद्दल प्रसिद्ध होते. तरीही त्यांनी इतरांना सांगितले की, "तुम्ही जेवून घ्या. रावसाहेब वेडा आहे. त्याच्यासाठी थांबू नका." ते स्वःही जेवायला गेले नाहीत.

सर्वांचे भोजन झाल्यावर श्रीमहाराजांनी सांगितले की, "आत तिघांची पाने घ्या आणि सर्वजण बाहेर या. मी त्याला जेवू घालतो." पाने मांडली गेली. तेव्हा श्रीमहाराज रावसाहेबांना म्हणाले, "तुला आईचे दर्शन घ्यायचे आहे ना? तिच्याबरोबर जेवशील ना?" श्रीबाबा महाराज आत जाऊन पाटावर बसले. श्रीमहाराजांनी स्वयंपाकघराचे दार बंद केले आणि स्वतः बाबा महाराजांचेजवळ बसले. बाबांनी श्रीमहाराजांचे पाय धरले आणि कळवळून म्हणाले की, "मला आईसाहेबांचे दर्शन घडवा." श्रीमहाराजांना आपल्या भोळ्या शिष्याचा हट्ट पाहून गहिवरून आले. त्यांनी त्यांना आलिंगन दिले आणि कुरवाळत म्हटले, "रावसाहेब हा माझा मोतीदाणा आहे. त्याचे मन मला राखले पाहिजे." आणि त्यांनी



आईसाहेबांना हाक मारली. "अहो, हे बघा, तुमचा वेडा मुलगा तुमच्याशिवाय जेवत नाही. तुम्हीच येऊन त्याला समजावून सांगा."

श्रीमहाराजांनी केलेल्या आवाहनामुळे प्रत्यक्ष आईसाहेब सगुण रूप घेऊन, जरीची साडी नेसून आणि दागिने घालून सजलेल्या जगन्मातेप्रमाणे प्रकट झाल्या. त्या बाबा महाराजांच्याजवळ बसल्या. ते त्यांच्या पायांवर अश्रू ढाळू लागले. आईसाहेबांनी त्यांना जवळ घेऊन व कुरवाळून शांत केले. मग स्वतःच्या हाताने त्यांना जेवू घातले. जेवण झाल्यावर त्या म्हणाल्या, "खुळ्या, मेलेल्या माणसाला परत बोलवता येते काय? मग तू असा वेडा हट्ट का करतोस? माया पांघरून अज्ञानात शोधण्याचा तुझा हा हट्ट श्रीसद्‌गुरूंची कृपा झाल्यावर तुला शोभत नाही. पंचमहाभूतात्मक हा देह कधी ना कधी सोडावाच लागतो. त्याच्या पलीकडे आत्म्याचे अविनाशी रूप आहे. त्यामध्ये ध्यान लाव." असा उपदेश देऊन त्या अदृश्य झाल्या. श्रीबाबा महाराजांनी श्रीमहाराजांच्या पायी लोटांगण घातले. त्यांनी त्यांना उचलून मिठी मारली आणि म्हटले, "रावसाहेब, आज मी माझे सर्वस्व तुला देऊन टाकले आहे. आता आपणा दोघांत द्वैत उरले नाही. तुझा संपूर्ण अहंकार मी घेतला आहे."

देहत्यागानंतर निसर्गाचा अटळ नियम मोडून आईसाहेब आपल्या या मुलासाठी सगुण स्वरूपात प्रकट झाल्या आणि त्यांनी आपल्या हातांनी मोठ्या प्रेमाने त्यांना भरविले.

धन्य आहे बीडकर महाराजांचा कृपाळूपणा, धन्य आहे आईसाहेबांची वत्सलता आणि धन्य आहे श्रीबाबा सहस्रबुद्धे महाराजांची भक्ति-भावुकता.

* * *

# १२. पाहता येई कसे ?

आईसाहेबांनी १९११ मध्ये देहत्याग केला. त्यानंतर श्रीमहाराज आपल्या लोकांना व्यावहारिक व पारमार्थिक उपदेश देऊ लागले. लोकांनी आपली उन्नती करून घ्यावी, असे त्यांना वाटत असे. याची काळजी त्यांना शेवटपर्यंत वाटत असे. कधी ते म्हणत की, "आता आम्ही जाणार." तर कधी ते म्हणत, "राम-कृष्णादी अवतारी पुरुषांनाही जावे लागते, म्हणून हा देह कधी ना कधी जाणारच." आपल्या लोकांना आश्वासन देत ते सांगत, "तुमचे जीवन व्यर्थ जाणार नाही. निश्चयाने, प्रेमाने व सावधपणाने सर्व काही पूर्णत्वास पावते. विश्वासपूर्वक नित्य हळूहळू अभ्यास करावा. सर्व काही देणारा तो एक परमात्माच होय. त्याच्याशिवाय या जगात दुसरे काही नाही."

श्रीमहाराजांना मूळव्याधीचे जुने दुखणे होते. ते त्यांनी नर्मदा-परिक्रमेच्या वेळी एका ब्राह्मणाला दु:खापासून मुक्त करून घेण्यासाठी स्वत:वर ओढवून घेतले होते. फार यातनांमुळे ते गप्प पडून राहात. कधी रक्त वाहून गेल्यावर अशक्तपणा येई. शेवटी-शेवटी त्यांना लघवीचा त्रास होऊ लागला. मध्येच ते "अंबे,अंबे, सद्गुरू, सद्गुरू," अशी हाक मारीत. दि. ३१ मार्च १९१३ रोजी ते घाबरे-घुबरे झाले. सकाळी डॉ. भागवत आले. त्यांनी औषध पाठवितो असे सांगितले, तेव्हा श्रीमहाराज म्हणाले की, "तुम्हाला ठाऊक आहेच की आम्हाला विदेशी औषध चालत नाही." डॉक्टर म्हणाले, "मी पावडर पाठवितो. गरम पाण्याबरोबर घ्या." श्रीमहाराज अल्कोहोलचे विदेशी औषध घेत नसत. ते भ्रुकुटीमध्ये ध्यान लावून पडून राहिले. मंगळवारी १ एप्रिल १९१३ रोजी (फाल्गुन वद्य दशमी, शक १८३४) दुपारी बारा वाजण्याच्या सुमारास त्यांची प्राणज्योती अनंत ब्रह्ममध्ये विलीन झाली. त्यांनी काही संन्यास घेतला नव्हता, म्हणून त्यांचा अंत्यसंस्कार दुसऱ्या दिवशी केला गेला. त्यामुळे त्यांचे शिष्य-भक्तगणही येऊ शकले. मुंबई, ठाणे, कल्याण, नाशिक इत्यादी ठिकाणांहूनही भक्त आले.



ते गेल्याचे कुणाला कळलेच नाही. कधी लोकांना त्यांनी म्हटले होते की, "आम्ही केव्हा जाऊ. याचा तुम्हाला पत्तासुद्धा लागणार नाही." आणि असेच झाले. थेंब सागरात मिसळून जातो, तेव्हा तो कसा बरे दिसेल? 'बिंदू सागरा मिळे, तो कसा बरे दिसे?'

श्रीमहाराजांनी दत्तक घेतला नव्हता, परंतु आण्णासाहेब बहुतुले यांना आपला उत्तराधिकारी मानले होते. ते सन १९०३ पासून श्रीमहाराजांच्या सेवेसाठी मठात राहात होते. आण्णासाहेबांनी आईसाहेबांचेही अंत्यसंस्कार केले होते. त्यांनी श्रीमहाराजांचेही केले. श्रीमहाराजांच्या नंतर ठीक १२ वर्षे मोठ्या कौशल्याने श्रीबीडकर महाराजांचा मठ त्यांनी चालविला. त्यांनी मोठ्या निष्ठेने पूजा-पाठ सणवार इत्यादी मठाच्या परंपरेप्रमाणे चालविले आणि सन १९२५ रोजी आपल्या सद्गुरूंच्या पुण्यतिथी दिवशीच देह ठेवला. त्यांनी पाच विश्वस्तांचे डीड केले. त्या लोकांनी मठाचे काम पुढे चालू ठेवले. आता नवे ट्रस्टी आहेत. त्यांनी मठास नवीन रूप दिले आहे.

* * *

**श्रीरामानंद उवाच**

शरीराची ममता ही योगमार्गात विघ्न आणते. ती ममता एखाद्या विशिष्ट मार्गाने दूर होते, असे म्हणता येत नाही. ज्याला जो मार्ग सोयीचा वाटेल, त्याने तो स्वीकारावा. कोणत्याही यम-नियमांच्या भानगडीत न पडता, देह-प्रारब्ध हे भोगूनच संपविले पाहिजे. सुख मिळो अगर दु:खच सोसावे लागो, म्हणून प्रारब्ध भोगण्याचा हा संकल्प केला पाहिजे.

# १३. धन्य हा दाता

श्रीबीडकर महाराज हे आपल्या शिष्यांच्या-भक्तांच्या कल्याणाची काळजी घेत. कधी ते प्रेमाने समजावून सांगून, कधी एखादी गोष्ट सांगून, कधी संतापून, कधी शिव्या देऊन, तर कधी दृष्टांत देऊन लोकांना लौकिक व पारमार्थिक गोष्टींचे रहस्य सांगत असत. ते आपल्याजवळचे सर्व काही देण्यास तयार असत. प्रत्येक जण आपल्या परीने प्रयत्न करी, परंतु त्या कसोटीला उतरणे सोपे नसे. मात्र ते दयाळू आपल्यापरीने लोकांना जीवनाचे गूढ सांगणारे गुरू होते.

**दामोदर देशपांडे**

फलटण (जि.सातारा) येथील दामोदर त्रिंबक देशपांडे हे लहानपणापासूनच श्रीबीडकर महाराजांच्या सान्निध्यात आले. श्रीदत्तात्रेयांचे अवतार असलेले अक्कलकोटनिवासी श्रीस्वामी समर्थ यांचे एक प्रमुख शिष्य हरीकाका हे विदेही सत्पुरुष फलटणला राहात होते. तेथील बाणगंगेच्या पलीकडील तटावर त्यांची समाधी आहे. समाधीच्यामागे हरीकाका यांची मोठी तसबीर टांगलेली आहे. दामोदर देशपांडे हे लहानपणी रोज सकाळी समाधीच्या दर्शनास जात असत व तेथून आपले शिक्षक बाळाभाऊ निरोखेकर (दत्तोपंत निरोखेकरांचे भाऊ) यांच्याकडे जात. एके दिवशी दामोदर हा समाधीच्या दर्शनास गेला. तेव्हा तेथील तसबिरीमध्ये हरीकाकांच्या ऐवजी धोतर नेसलेले व मांडी घालून बसलेले दुसरेच कोणीतरी साधु-पुरुष दिसले. डोळे चोळून त्यांनी पाहिले तेव्हा हरीकाका दिसले. नमस्कार करून मस्तक वर केले, तेव्हा पुन्हा ते अनोळखी पुरुष दिसले. असे तीन-चार वेळा घडले. ते चकित होऊन बाळाभाऊंच्या घरी आले. बाळाभाऊ हे श्रीबीडकर महाराजांचे शिष्य होते. नुकतेच ते सद्गुरूंचे दर्शन घेऊन पुण्याहून आले होते. बरोबर त्यांनी सद्गुरूंचा फोटो आणला होता. तो पाहताच दामोदर देशपांडे याने ओळखले की हरीकाकांच्या जागी दिसलेले हेच ते साधू होत. त्यांनी बाळाभाऊंना ही गोष्ट सांगितली. बाळाभाऊ म्हणाले, "अरे, हे पुण्याचे श्रीरामानंद बीडकर



महाराज होत. तुझा त्यांच्याशी काही ऋणानुबंध दिसतोय. त्यांनी तुला बोलावले आहे, असे वाटते. पुढच्या वेळी तू माझ्याबरोबर पुण्यास ये."

काही दिवसांनंतर बाळाभाऊ यांच्याबरोबर दामोदर देशपांडे हे श्रीमहाराजांच्याकडे गेले. तेव्हा त्यांनी मोठ्या प्रेमाने त्यांची चौकशी केली आणि विचारले, "तू माझ्याकडे राहातोस का?" आईची परवानगी मिळाल्यावर ते पुण्यात श्रीमहाराजांच्याकडे आले. त्यांचे शिक्षण श्रीमहाराजांनी केले. मॅट्रीक झाल्यावर श्रीमहाराजांनी त्यांचे लग्न नाशिकच्या विष्णुपंत स्मार्त यांच्या मुलीशी केले. त्यांनी दामोदरला आपला मुलगा मानले. त्याचे नाव एकनाथ रामचंद्र बीडकर असे ठेवले. पुढे विष्णुपंत स्मार्त यांनी नाशिकला दत्तमंदिर बनविले. तेव्हा त्याची जबाबदारी श्रीमहाराजांनी दामोदर देशपांडे यांना सोपविली.

एकदा दामोदर देशपांडे हे फलटणला गेले होते, इतक्यात इकडे पुण्यात श्रीमहाराज समाधिस्थ झाले. दामोदरपंतांना कोणी कळविले नाही. वृत्तपत्रातून जेव्हा ही बातमी मिळाली, तेव्हा ते पुण्याला धावत आले. त्यांनी विचारले की, "मला का कळविले नाही?" तेव्हा तेथील लोक म्हणाले की, "तुम्ही कोण?"

श्रीमहाराजांच्या पुण्यातील मठात दामोदरपंतांना कोणतेही स्थान उरले नाही. आई-बहिणी-पत्नी या संपूर्ण कुटुंबाची जबाबदारी त्यांच्यावर होती आणि उपजीविकेचे कोणतेही साधन नव्हते. कोठे नोकरी मिळाली तर लोक तक्रार करीत की हा खोटे नाव लावतोय, नोकरी सुटे. त्रासून ते एक दिवस श्रीसंत एकनाथ महाराजांच्या पैठणला गेले. ते श्रीएकनाथ महाराजांच्या घराजवळ झोपले असताना रात्री स्वप्न पडले. श्रीमहाराजांनी स्वप्नात येऊन सांगितले की, "वेडेपणा करू नकोस. नाशिकला जा. सर्व काही ठीक होईल."

श्रीमहाराजांच्या आज्ञेप्रमाणे दामोदरपंत नाशिकला आले. विष्णुपंत स्मार्त यांना आनंद झाला. त्यांना नाशिकात नोकरीही मिळाली. मग त्यांनी तेथे बिऱ्हाड केले. ते निष्ठापूर्वक दत्तमंदिरात सेवा करू लागले.

सन १९२५ श्रीमहाराजांची पुण्यतिथी आली. दामोदर देशपांडे यांना श्रीमहाराजांनी स्वप्नात येऊन सांगितले की, "यावर्षी पुण्यात माझी पुण्यतिथी साजरी होणार नाही. तेव्हा तू येथेच नाशिकमध्ये कर. दामोदर देशपांड्यांनी नाशिकला पुण्यतिथी केली. महाप्रसाद झाला. पुण्याच्या मठास कळविले. सर्वजण चकित झाले, कारण पुण्यतिथीच्या दिवशीच आण्णासाहेब बहुतुले कैलासवासी

झाले होते. त्यामुळे तेथे पुण्यतिथी करता आली नाही. ही गोष्ट देशपांड्यांना कुणी कळविली?

या वेळी आणखी एक विलक्षण गोष्ट घडली. पुण्यतिथीसाठी खूप लोक आले. बाजारातून उधार माल आणून दुप्पट भोजन बनवावे लागले. काही दिवसानंतर दुकानदार उधारीसाठी आला. पैसा कुठून आणायचा? दामोदर देशपांडे यांच्या मनात आले की, "श्रीमहाराजांच्या आज्ञेने व्यवस्था केली होती, आता तेच पत राखतील," असे म्हणून त्यांनी श्रीमहाराजांच्या गादीवरील चादर झटकली तर बावीस रूपये दहा आणे पडले. येऊन बसलेल्या दुकानदाराला उधारी विचारली तर त्याने बावीस रुपये दहा आणे उधारी असल्याचे सांगितले. उधारी देऊन टाकली. श्रीमहाराजांची लीला दुसरे काय?

**देशपांडे यांचा मुलगा राहुल**

देशपांडे यांचा मोठा मुलगा राहुल हा ५-६ वर्षाचा असतानाच वारला. तो बडबड्या व हट्टी होता. तो वारंवार आजारी पडे. एके दिवशी रात्री १० वाजता त्याने हट्ट धरला की, "मुरलीधर कृष्णाचे चित्र हवे." ही १९३० च्या पूर्वीची गोष्ट आहे. त्या काळी वीज नव्हती. रात्री ७-७॥ लाच दुकाने बंद होत असत. त्याला तऱ्हेतऱ्हेने सांगून पाहिले," परंतु तो हट्ट धरून ओरडू लागला. तेव्हा त्याला विचारले की, "एवढ्या रात्री चित्र कुठे मिळणार?" तो म्हणाला, "गंगेकाठी मिळेल." दामोदर देशपांडे तेथे गेले. तेथे एक माणूस दिवा लावून चित्रे विकत बसला होता. चित्र विकत घेतल्यावर त्याला विचारले की, "इतक्या रात्री तू एकटा कसा काय बसला आहेस?" तो म्हणाला, "कुणीतरी येऊन सांगितले होते की चित्र विकत घेण्यासाठी कुणीतरी येईल, तोपर्यंत थांब." त्या छोट्या राहुलमध्ये हे जाणण्याची शक्ती कोठून आली होती? याच्यामागे श्रीमहाराजांची लीला होती काय?

नाशिकच्या दत्तमंदिरात कुणी पुण्याहून आला की राहुल श्रीमहाराजांच्या प्रमाणे वेचक शिव्यांचा भडिमार करायचा. शिव्या देताना त्याची लकब श्रीमहाराजांच्यासारखी असायची. एकदा दामोदरपंतांनी त्याला विचारले, "शेवटी तू कोण आहेस तरी कोण?" तो म्हणाला, "आम्ही कोणीही असू. तुला काय



फरक पडतोय?" आजारपणात एके दिवशी त्याने दत्ताच्या पादुका आणण्यास सांगितल्या व त्या आपल्या हृदयी धरून प्राण सोडला.

**दिनकर देशपांडे**

दामोदर देशपांडे हे काशी-यात्रेच्या वेळी मुलासाठी काशी-विश्वेश्वराला नवस बोलले होते, त्याप्रमाणे सन १९३१ मध्ये त्यांना मुलगा झाला. त्याचे नाव दिनकर ऊर्फ विश्वनाथ असे ठेवले. त्याला "भाऊ" असेही म्हणत असत. नवस फेडण्यासाठी त्याची मुंज काशीला जाऊन करण्यात आली. मुंजीच्या वेळी जेव्हा अंतरपाट धरला, तेव्हा दामोदरपंतांना दिसले की शिवलिंगासह प्रत्यक्ष श्रीबीडकर महाराज उभे आहेत.

याच दिनकरला १९४१ मध्ये मोठा ताप आला. तो दोन दिवस बेशुद्ध होता. वडील दामोदरपंत उशाशी बसून जप करीत होते. रात्री दोनच्या सुमारास देवघरातील फोटोमधून श्रीमहाराजांनी प्रकट होऊन आपला उजवा हात त्याच्या डोक्यावर ठेवला आणि ते दिसेनासे झाले. दिनकर लगेच शुद्धीवर आला. स्वप्नात त्याला एक आक्राळ-विक्राळ देवी आपला जबडा पसरून गिळून टाकायला आली आहे, असे दिसले. एवढ्यात श्रीमहाराजांनी येऊन तिचा हात पकडला. त्याच वेळी दिनकर बरा होऊ लागला.

**अढळ श्रद्धा**

दत्तोपंत निरोखेकर यांच्याबरोबर मुकुंद मोघे हेसुद्धा सेवेसाठी श्रीमहाराजांच्याजवळ राहात असत. नाशिकच्या राजद्रोहाच्या कारस्थानाच्या खटल्यात पोलीस मुकुंद मोघे यांना पकडून घेऊन गेले. त्या वेळी निरोखेकर तेथे नव्हते. परत आल्यावर जेव्हा त्यांना समजले तेव्हा ते घाबरले की, "आता पोलीस मलाही पकडून नेतील व मारून-बदडून हवा तो जबाब घेतील." त्यांची अवस्था पाहून श्रीमहाराज म्हणाले की, "तुझे मन अस्वस्थ आहे, तेव्हा तू चार-आठ दिवस मुंबईला जा." ते मुंबईला आपले मित्र भागवतांच्याकडे गेले. काही दिवसांनंतर बाबासाहेब कर्वे यांना कळले की श्रीमहाराजांच्यावर पकड वॉरंट निघाले आहे. त्यांनी ही बातमी श्रीमहाराजांना जाऊन कळविण्यास सांगितले. निरोखेकर मुंबईहून पुण्यास आले. ते सरळ श्रीमहाराजांच्या घरी न जाता त्यांचे

भक्त असलेल्या आण्णासाहेब गुप्ते यांच्याकडे गेले. तेव्हा गुप्ते म्हणाले, "मी संध्याकाळी श्रीमहाराजांच्याकडे गेलो होतो. त्यांनी एक गोष्ट सांगितली की -

एका गावात भगवान शिवाचे मंदिर होते. एक श्रीमंत माणूस तेथे येऊन शिवलिंगाची षोडशोपचार पूजा करी. त्यानंतर दुपारी बाराच्या सुमारास एक गुराखी तोंडात पाणी घेऊन येई. तो पूजा काढून टाकी. चूळ शिवलिंगावर टाकून **'शंभो हर हर'** अशी आरोळी देऊन निघून जाई. एकदा पार्वतीने शिवाला विचारले, "तुम्हाला घाणेरड्या गोष्टी आवडतात. तो श्रीमंत माणूस तुमची चांगली पूजा करतो, पण तुम्ही त्याच्यावर प्रसन्न होत नाही. तो गुराखी तोंडातली चूळ तुमच्यावर टाकतो, तरीही तुम्ही त्याला शिक्षा करीत नाही." तेव्हा शिव म्हणाला, "मी फक्त शुद्ध गोष्टीच स्वीकारतो, हे काही दिवसांतच तुला पटेल."

काही दिवसानंतर तो श्रीमंत माणूस पूजेसाठी आला, इतक्यात मंदिरावर गडगडाट झाला. वरून दगड पडू लागले. मंदिर पडणार या भीतीने तो माणूस पळून गेला. दुपारी बारा वाजले तेव्हा तो गुराखी आला. पुन्हा गडगडाट होऊन मोठे दगड पडू लागले. त्याला वाटले की, "शिवलिंग फुटले तर मी उद्या कुणाची पूजा करणार व कशी करणा? काहीही झाले तर हे वाचविले पाहिजे." असे म्हणून तो शिवलिंगाला कवटाळून पडून राहिला. गोष्ट पुरी झाल्यावर श्रीमहाराज म्हणाले, "निष्ठा अशी असावी."

आण्णासाहेबांचे ऐकल्यावर निरोखेकरांना उमगले की श्रीमहाराजांनी ही गोष्ट माझ्यासाठी सांगितली आहे. ते श्रीमहाराजांच्याकडे आले आणि त्यांना वॉरंटची बातमी सांगितली. श्रीमहाराजांनी शांतपणे चहा घेतला आणि म्हणाले, "आमचे काय? इथे राहायच्याऐवजी तुरुंगात राहू." बातमी भयंकर होती, परंतु ते जरासुद्धा डगमगले नाहीत. कुणाला काहीच झाले नाही. मुकुंद मोघे हेही निर्दोष सुटले. अढळ निष्ठाच मनुष्याला संकटातून बाहेर काढते.

**गंगूबाईची गुरुनिष्ठा**

नाशिकला श्रीनारायण महाराज चांदोरकर नावाचे मोठे सिद्ध-पुरुष होते. ते गोदावरीच्या तीरावर विदेही नग्नावस्थेत पडून असत. गंगूबाई नावाची एक कलावंतीण त्यांची शिष्या होती. ती रोज त्यांच्यापाशी येऊन त्यांना चांगल्या



गालीच्यावर बसवी आणि तासभर आपल्या गोड आवाजात त्यांना भक्तिपदे ऐकवी.

एके दिवशी नाशिकचा इंग्रज कलेक्टर आपल्या मड्डमबरोबर नदीकाठी फिरायला आला. तेथे नग्नावस्थेत पडलेले श्रीनारायण महाराज त्याला दिसले. त्याने त्यांना नाशिकपासून दूर कुठेतरी नेऊन ठेवण्याचा हुकूम दिला. श्रीनारायण महाराजांना तेथून हलवून चांदोरीला नेऊन ठेवण्यात आले. आपल्या गुरूच्या नित्य दर्शनास गंगूबाई मुकली. मग ती आपल्या यजमानाबरोबर टांग्यातून दर गुरुवारी चांदोरीला जाऊ लागली आणि तेथे त्यांची सेवा करू लागली. त्यांनी तिची तऱ्हेतऱ्हेने परीक्षा घेतली. कधी ते तिच्या मांडीवर बसत, तेथेच शौच करीत. गंगूबाई मोठ्या भक्तीने त्यांना स्वच्छ करून बसवी व पदे ऐकवी.

एकदा श्रीनारायण महाराज यांनी तिला विचारले की, "तू आमच्यामागे का लागली आहेस? तुला काय हवे?" ती म्हणाली की, "मला आपला संग हवा." हे ऐकताच महाराजांनी तिला जोराने थोबाडीत मारली. त्यासरशी ती बेशुद्ध झाली. तिचा यजमान पाणी आणण्यास धावला, तेव्हा महाराजांनी त्याला हात धरून बसविले व म्हटले, "तिचा तुझा संबंध संपला. हवे तर सेवा कर. उद्या याच वेळी ही शुद्धीवर येईल." महाराजांच्या आज्ञेप्रमाणे तो तिला घेऊन नाशिकला गेला आणि तिची सेवा करू लागला.

ते श्रीनारायण महाराज चांदोरकर हे समाधिस्थ झाल्यावर श्रीबीडकर महाराज एकदा नाशिकला आले होते. त्यांच्या दर्शनासाठी गंगूबाई दत्तमंदिरात आली. श्रीमहाराजांनी तिला सांगितले की, "गंगूबाई, मी जोपर्यंत इथे आहे, तोपर्यंत रोज प्रसादाला येत जा." त्यांच्या आज्ञेप्रमाणे ती रोज येत असे आणि भोजन झाल्यावर श्रीमहाराजांचेजवळ बसून पान-तंबाखू खाऊन जात असे.

एके दिवशी श्रीमहाराज जेवणानंतर आपल्या लोकांना म्हणाले, "तुम्ही विचारता की परमार्थामध्ये आम्ही पुढे का जात नाही? या आज तुम्हाला दाखवितो!" सर्वजण तेथे गेले, त्या वेळी निरोखेकरही होते. गंगूबाई पान खाऊन तंबाखू तोंडात टाकत होती, एवढ्यात श्रीमहाराजांनी विचारले, "गंगूबाई, चांदोरीला गेला होता काय?" हे ऐकताच तिला रडू कोसळले. स्फुंदत ती म्हणाली,

"चांदोरीत आता काय खाक राहिली आहे?" मन आवरल्यावर डोळे पुसून ती निघून गेली. मग श्रीमहाराजांनी लोकांना सांगितले की, "बघा, हे कसे गुरुप्रेम. जेव्हा गुरूंचे नाव ऐकताच रडू कोसळले, तेव्हाच परमार्थात पाऊल पुढे पडेल."

**अहंकाराचे अन्न**

श्रीमहाराज जेव्हा नाशिकच्या दत्तमंदिरात होते, तेव्हा रोज एखादा भक्त नैवेद्य करीत असे. एके दिवशी गोडबोले नावाच्या एका गृहस्थाचा नैवेद्य होता. त्यांचे वडील बंधू प्रत्यक्ष श्रीस्वामी समर्थांचे शिष्य होते. त्यांना घमेंड होती की मी प्रत्यक्ष स्वामी समर्थांचा शिष्य आहे, मग या बीडकर महाराजांच्यामध्ये विशेष काय आहे?" त्यांच्या मनात हा भाव जागा होताच श्रीमहाराज जणू स्वत:शीच बोलू लागले. ते कोणाशी तरी बोलत असल्याचे जाणवत होते. त्यांना कुणीतरी जेवण्यास मनाई करीत होते. श्रीमहाराज म्हणत होते, "तो आपलाच आहे. भोजन घेतल्याने काय होणार?" श्रीमहाराज तर्क करीत होते, परंतु त्यांना भोजन करण्यापासून कुणीतरी परावृत्त करीत होते. शेवटी त्यांच्या तोंडून उद्‌गार बाहेर पडले, "हा माझ्या छातीवर बसला आहे. मला उठू देणार नाही."

भोजनाची तयारी झाली. गोडबोले त्यांना बोलावण्यास आले; परंतु श्रीमहाराजांची हुडहुडी कमी होत नव्हती. मग ते म्हणाले, "मला जेवता येणार नाही. तुम्ही जेवून घ्या. हवेच असेल तर नैवेद्याचे थोडेसे दूध आणा." ते घोटभर दूध घेऊन झोपले. प्रत्यक्ष श्रीस्वामी समर्थांनी त्यांना अडविले होते आणि सद्‌गुरूंची आज्ञा त्यांना मानावी लागली, असे वाटत होते. गोडबोलेंच्या खोट्या अहंकारामुळे त्यांचे अन्न घेण्यास सद्‌गुरूंनी श्रीमहाराजांना परावृत्त केले.

**मांत्रिक फकीर**

श्रीमहाराज नाशिकला होते, तेव्हा एके दिवशी सकाळी गच्चीवर उभे होते. खाली रस्त्यावरून एक फकीर जात होता. श्रीमहाराजांना पाहिल्यावर तो पाय मागे-पुढे करीत थांबू लागला. त्यानी त्याला वर बोलाविले. कुणीतरी विचारले की, "फकीर साहेब, तुमच्याजवळ काही मंत्र-तंत्र असल्यास दाखवा." त्यावर तो म्हणाला, "तू काय बच्चा आहेस. तुला काय दाखवायचे? बाबा बघत असतील तर दाखवीन." श्रीमहाराजांनी सांगितल्यावर त्याने एका कोऱ्या कागदावर पेन्सिलीने



काहीतरी लिहिले व तो खाली जमिनीवर ठेवला. त्यावर रुमाल झाकून काही मंत्र म्हटले आणि रुमाल काढून घेतला. मग तो कागद नाचतनाचत लोकांच्याकडे जाई आणि परत फिरे, असे बऱ्याच वेळा झाले. परंतु तो कागद त्या लोकाना स्पर्श करू शकला नाही." शेवटी तो फकीर श्रीमहाराजांना म्हणाला, "आमची जादू तुमच्यासाठी नाही." आणि त्याने त्याना सलाम केला. श्रीमहाराजांनी त्याला काही पैसे देऊन पाठवून दिला. तेव्हा ते म्हणाले, "तो कागद जर कुणाला शिवला असता तर त्याची मुरकुंडी वळली असती." त्यानी आपल्या प्रभावाने फकिराची जादू कुचकामी करून टाकली होती.

**जंगली महाराज**

पुण्यात जंगली महाराज नावाचे सिद्धपुरुष होऊन गेले. आज जेथे जंगली महाराज रस्ता आहे, तेथे पूर्वी दाट जंगल होते व त्यामध्ये ते राहात होते. त्यामुळे त्यांचे नाव जंगली महाराज असे पडले. एके दिवशी श्रीमहाराज तेथे गेले. जंगली महाराजांनी त्यांची परीक्षा घेण्यासाठी मंत्र फुंकला, त्यासरशी श्रीमहाराजांचे संपूर्ण शरीर आखडून गेले. ते तेथेच आडवे होऊन आपले आराध्य मारुतीचे स्मरण करू लागले. रात्री गाढ झोपी जाऊन सकाळी उठून बसले. जंगली महाराज सकाळी त्यांना पाहून चकित झाले व त्यांनी शाबासकी दिली. तेव्हापासून ते श्रीमहाराजांचा आदर करू लागले.

**दर्शनासाठी भक्तांना बोलावणे**

ठाण्याला केशवराव गुप्ते नावाचे श्रीमहाराजांचे शिष्य होते. श्रीमहाराज समाधिस्थ होण्यापूर्वी तीन दिवस गुप्त्यांच्या स्वप्नात आले. ते म्हणाले, " तुला दर्शन हवे ना? ये, मी चाललो." गुप्ते यांनी त्या स्वप्नाकडे लक्ष दिले नाही. दुसऱ्या दिवशी तसेच स्वप्न पडले. तरीही त्यांनी लक्ष दिले नाही. तिसऱ्या दिवशी पुन्हा स्वप्न पडले; तेव्हा त्यांनी पुण्याकडे धाव घेतली. असाच अनुभव श्रीमती गोदूताई केतकर यांनाही आला. त्यांच्या स्वप्नात येऊन श्रीमहाराज म्हणाले, "मी निघालो, तू बसून का आहेस?" .

**फकिराचे उद्‌गार**

श्रीमहाराजांची खालावत चालेली अवस्था पाहून दत्तोपंत निरोखेकर

विमनस्क झाले. त्या वेळी नाशिकचे अवधूत बाबा पुण्यात आले होते. त्यांना भेटून मन शांत करण्यासाठी निरोखेकर गेले, परंतु त्यांची भेट झाली नाही. रस्त्यात एक फकीर भेटला. तो म्हणाला की, “तुझ्या बाबांनी बरे केले. पिकलेले फळ तुमच्यासाठी झाडावर किती काळ राहाणार? अल्ला सब कुछ अच्छा करनेवाला है। ” त्याचे बोल ऐकून निरोखेकरांच्या मनाला समाधान लाभले.

**बंगाली साधू**

श्रीमहाराज जेव्हा नाशिकला होते, तेव्हा त्यांच्याकडे एक बंगाली साधू येत असत. ते अकरा-बारा वाजता येत आणि तेथेच जेवत असत. ते उन्मनी अवस्थेत राहात असत. त्यांच्या पानात जे वाढले जाई ते सर्व एकत्र करून ते खात असत आणि उष्टी पत्रावळ समोर राहणाऱ्या गोसाव्याच्या दारात फेकत असत. तो ओरडायचा, शिव्या द्यायचा. त्याचा आनंद घेत व नक्कल करीत ते निघून जात. अंगावर कधी फक्त लंगोटी असायची, तर कधी चिंध्या, कधी नवे धोतर, शर्ट व कोट असे. ते सिद्ध-पुरुष होते, परंतु वेडसरपणा धारण केलेला होता. श्रीमहाराजांच्याकडे आल्यावर मात्र ते गप्प असत. त्यांच्यासमोर बडबड केल्यावर जेव्हा श्रीमहाराज गप्प बसण्यास सांगत, तेव्हा गुडघ्यात डोके खुपसून तासन्तास गप्प बसत असत. कधी दुपारी येत, तर कधी संध्याकाळी. श्रीमहाराज फळ, पेढे जे असेल ते त्यांना देत. संध्याकाळी अंधार पसरू लागला की ते वनात शिरून दिसेनासे होत आणि योगाभ्यास करीत. श्रीमहाराज मोठ्या प्रेमाने त्यांची चौकशी करीत. ते आपल्या शिष्य-भक्तांना म्हणत की, “देव तुमच्यासाठी येथे घर बसल्या अशा पुरुषाला घेऊन येतो.”

**रक्षणकर्ता गुरू**

दत्तोपंत निरोखेकर (द. ल. निरोखेकर) हे श्रीमहाराजांचे निष्ठावान शिष्य होते. ते निष्णात वकील होते. त्यांना डॉक्टर किंवा काकासाहेब असेही म्हणत. ते त्या काळचे बी.ए., एलूएलू. बी. होते. शिक्षणासाठी ते आपले मित्र भागवत यांच्याकडे ठाण्याला गेले होते. त्यांनी अभ्यासासाठी भाड्याची खोली घेतली होती. दुर्दैवाने त्यांच्याशेजारी चोरी झाली आणि निरोखेकरांच्यावर संशय घेतला जाऊ लागला. पोलिसांनी येऊन त्यांची चौकशी केली. ते घाबरून गेले की आता



पोलीस मारतील. त्या रात्री त्यांना स्वप्न पडले की एक साप त्यांच्यामागे येत आहे आणि ते पळत आहेत. एवढ्यात एक माणूस काठी घेऊन आला आणि त्याने सापाला पळवून लावले. तो माणूस शुभ्र धोतर नेसला होतो आणि त्या धोतराचाच एक भाग अंगावर घेतला होता.

पुढे दत्तोपंत निरोखेकर हे भागवत यांच्याबरोबर श्रीमहाराजांच्याकडे गेले, तेव्हा त्यांना दिसले की स्वप्नातील सापाला पळवून लावणारे हेच गृहस्थ आहेत. त्यापूर्वी त्यांनी श्रीमहाराजांना कधीही पाहिले नव्हते. त्यामुळे प्रभावित होऊन ते त्यांचे भक्त बनले. त्यांनी सन १९०२ मध्ये रामनवमी दिवशी श्रीमहाराजांचा अनुग्रह घेतला आणि स्वत:ला निष्ठेने त्यांच्या चरणी सोपविले. एलएल. बी. झाल्यावर श्रीमहाराजांच्या आज्ञेप्रमाणे त्यांनी मुंबईच्या एका हायस्कूलमध्ये संस्कृत शिक्षकाची नोकरी केली. नंतर त्यांच्याच सांगण्यावरून ते नोकरी सोडून श्रीमहाराजांच्या आश्रयाला आले. श्रीमहाराजांच्या कठोर शिस्तीमध्ये आपल्याकडून गुरु-सेवा कशी घडणार? दृढ निष्ठा ही काही थट्टा नाही, या काळजीत असताना एका रात्री त्यांना स्वप्नात येऊन एका साधूने उपदेश दिला की, “गुरुसेवा मोठी कठीण गोष्ट आहे. साप जेव्हा बिळात शिरतो, तेव्हा त्याची शेपटी धरून आपण ओढायचा प्रयत्न करू लागलो की शेपटी तुटेल; पण तो बाहेर येणार नाही. मनात एवढा दृढ निश्चय असेल तर गुरुसेवा घडेल.” दत्तोपंत गुरूंची सेवा करू लागले. त्यांच्याकडे बाजाराचे काम असे. खरेदीमध्ये श्रीमहाराज काही ना काही दोष काढून इतकी आग पाखडत की रडू कोसळे, परंतु आपल्या निष्ठेमुळे दत्तोपंत श्रीमहाराजांचे लाडके झाले होते. श्रीमहाराजांनीच त्यांचे विवाह व गर्भाधान हे संस्कार केले. लग्नामुळे दत्तोपंतांची जबाबदारी वाढली. नोकरी नाही, मिळकत नाही. सर्व सोडून पळून जावे, असे त्यांना वाटू लागले. रात्री त्यांना स्वप्न पडले की ते पुण्याच्या तुळशीबागेतील राममंदिरात गेले आहेत आणि रामासमोर प्रत्यक्ष श्रीमहाराज उभे आहेत. दुसऱ्या दिवसापासून ते श्रीमहाराजांची आज्ञा घेऊन श्रीरामाच्या दर्शनाला जाऊ लागले.

दत्तोपंत निरोखेकर रात्री श्रीमहाराजांना विडा कुटून देत असत. एके दिवशी त्यांच्या मनात विचार आला की संत एकनाथ महाराज आपले गुरू

श्रीजनार्दनस्वामी यांना विडा कुटून देत असत आणि त्यांची पिकदाणी पिऊन टाकीत असत. माझा एवढा अधिकार नाही, परंतु जर श्रीमहाराज आपल्या मुखातील विडा देतील तर मी खाईन. दत्तोपंतांच्या मनातील विचार श्रीमहाराजांनी ओळखला. ते म्हणाले, "कुठे एकनाथ आणि कुठे तू. केल्याविना बोलणे व्यर्थ आहे."

श्रीमहाराज उशिरा जागे झाल्यावर दुपारी सुमारे ११ वाजता बैठकीवर येत असत. तेव्हा पूजा झाल्यावर उरलेली फुले त्यांच्यासमोर ठेवली जात. ते त्या फुलांच्या माळा ओवून एखाद्या देवाच्या तसबिरीस घालण्यास सांगत. एके दिवशी पूजेनंतर फुलेच उरली नाहीत, तेव्हा त्यांनी कणेरीची फुले आणण्यास सांगितले, त्यावर दत्तोपंत म्हणाले, "मी गेलो होतो, परंतु आता तेथे फुले नाहीत." श्रीमहाराज म्हणाले, "जसे सांगितले, तसे कर." शेवटी दत्तोपंत तेथे गेले, तर ढिगाने फुले मिळाली. धोतरात घेऊन यावी लागली. श्रीमहाराज म्हणाले, "काय, फुले नव्हती ना? आता कोठून आली? असेच असते. जेव्हा भगवंत देईल तेव्हा इतके देईल की घेऊही शकणार नाहीस." पुढे दत्तोपंत निरोखेकर हे पोलीस प्रॉसिक्युटर झाले. भगवंताने त्यांना भरपूर दिले.

एकदा दत्तोपंत निरोखेकर यांना मलेरिया झाला आणि ताप पुष्कळ दिवस येत राहिला. फार अशक्तपणा आला. अशक्त स्थितीत ते काही लोकांच्याबरोबर रामनवमीसाठी पुण्यास निघाले. वाटेत देहूला जाण्याचे ठरले, परंतु दत्तोपंतांचा ताप चढला. त्यांनी आपल्याबरोबरच्या मंडळींना पुढे पाठविले आणि स्वत: श्रीसंत तुकाराम महाराज यांच्या निर्वाण-स्थानी जाऊन बसले. प्रकृती बिघडली. त्यांना वाटू लागले की आता मी मरतोय, इतक्यात आवाज आला की, "मरणार नाहीस. कर्म-भोग भोगत आहेस." हा सद्गुरू बीडकर महाराज यांचा आवाज होता. कारण आसपास कुणीही नव्हते. गुरुनिष्ठा दृढ असेल, तर कुठेही गुरूचे कृपा-छत्र मिळते व ते आश्वस्त करते.

दत्तोपंत निरोखेकर यांनी आपल्या दोन पुतण्यांची मुंज आळंदीला करायचे ठरविले. ते एका पुरोहिताकडे उतरले, परंतु दोन दिवसांनी एकादशी येत होती म्हणून त्याने श्रीनृसिंह सरस्वती (श्रीस्वामी समर्थांचे शिष्य) यांच्या मंदिरासमोरील धर्मशाळेत त्यांना आणून सोडले. तेव्हा दत्तोपंतांनी आळंदीचे श्रीनृसिंह सरस्वती



यांना प्रार्थना केली की, "आत्तापर्यंत आम्ही श्रीज्ञानेश्वर महाराजांच्या आश्रयास होतो, आता आपल्या आश्रयास आलो आहोत." दुसऱ्या दिवशी त्यांच्या २-३ वर्षाच्या मुलीला सडकून ताप आला. डॉक्टर म्हणाले, "कशाचा ताप आहे, हे कळत नाही." त्यांना स्वत:लाही फार ताप चढला. त्या गुंगीत असताना त्यांना ऐकू आले की, "आळंदीमध्ये दुसऱ्या कोणाचाच अधिकार नाही." ऐकताच त्यांना आपली चूक कळून आली. ते श्रीज्ञानेश्वरांच्या समाधिमंदिरात गेले आणि पूजा करून त्यांनी क्षमा-याचना केली. बस्स, त्यांचा आणि त्यांच्या मुलीचा ताप पाच मिनिटांत उतरला. सद्गुरूंनी दत्तोपत्तांची चूक सुधारली.

एकदा डिसेंबरच्या सुट्टीमध्ये दत्तोपंत सद्गुरूच्या सेवेसाठी व सान्निध्यासाठी पुण्याला आले. ते सद्गुरूंची बैठक स्वच्छ करू लागले. दोन-चार दिवसानंतर त्यांना काही विचित्र असा अनुभव येऊ लागला. बैठक साफ करताना आळस येऊ लागला आणि मनामध्ये देवांना घाणेरड्या शिव्या येऊ लागल्या. ते बेचैन झाले. या विचित्र अवस्थेत त्यांनी परत जाण्याचे ठरविले. श्रीमहाराजांची आज्ञा मिळाली व ते परत निघाले. जाताना श्रीमहाराजांना नमस्कार करायला गेले, तर ते म्हणाले, "दुरून नमस्कार कर, माझे पाय शिवू नकोस." मध्यरात्री रेल्वे होती. गाडीत दत्तोपतांना डुलकी आली. त्यांना दिसले की एक काळाकुट्ट पुरुष त्यांच्या शरीरातून बाहेर पडला व थोडा वेळ जवळ उभा राहून अदृश्य झाला. त्या क्षणापासून त्यांचे मन स्वच्छ झाले. त्यांच्या मनात येणाऱ्या वाईट गोष्टी सद्गुरूंच्या कृपेने नाहीशा झाल्या.

निष्ठा हवी, मग सद्गुरू आपल्या शिष्याला सर्व संकटांतून वाचवितो.

**इतर साधू**

श्रीबीडकर महाराजांचा अध्यात्मातील अधिकार तत्कालीन नाशिकचे दिगंबर योगी, गोपाळबाबा, शेगावचे गजानन महाराज, सोनगीरचे नानक महाराज, भुसावळची खालम्मा, पलूसचे धोंडीबुवा, शिरडीचे साईबाबा, नाशिकचे अवधूतबाबा, मौलाबाबा, त्र्यंबकेश्वरचे जहागिरदारबाबा इत्यादी साधु-सत्पुरुष मानत असत. श्रीमहाराजांचा एखादा शिष्य जेव्हा यांच्या दर्शनास जाई, तेव्हा त्यांच्या तोंडून येत असे की, "तुझा दाता धन्य आहे."

* * *

# १४. गुणसागर गुरू

भगवान श्रीदत्तात्रेयाचे अवतार, अक्कलकोटचे निवासी श्रीस्वामी समर्थ यांचे शिष्योत्तम प. पू. श्रीरामानंद बीडकर महाराज हे अवतारी पुरुष होते. धर्म-ग्लानी दूर करण्यासाठी, साधु-सज्जनांच्या रक्षणासाठी आणि भक्तीचा उन्मेष दाखविण्यासाठी भगवंत हा आपल्या विभूतींसह सगुण चरित्र प्रकट करतो. अनेक चढउतार यांनी भरलेले आणि अनेक वैशिष्ट्यांनी परिपूर्ण असलेले श्रीमहाराज यांचे चरित्र अद्वितीय होय. त्यांचे चरित्र पाहून असे वाटते की, "नर करे तो नर का नारायण बनता है।" त्याच्यामध्ये जे अनंत गुण होते, ते मनुष्यासमोर आदर्श ठेवतात. हरी हा अनंत आहे. त्याच्या कथाही अनंत आहेत. श्रीबीडकर महाराज यांच्या सगुण चरित्रातील काही प्रमुख वैशिष्ट्ये समजून घेतल्यास सहृदय भक्तांना लाभदायक ठरेल.

**व्यक्तित्व**

श्रीमहाराज हे उंच, सडपातळ बांध्यांचे व गौर वर्णाचे होते. डोळे पाणीदार होते. त्यांना पाहणारा आपोआप प्रभावित होत असे. ते रेशमी उंची वस्त्रे घालत. पागोटे, कोट व धोतर असा पोषाख. अत्तरांचा त्यांना शौक होता. अशा प्रभावी व्यक्तिमत्त्वाने संपन्न असलेले श्रीमहाराज जेव्हा मोठमोठ्या लोकांच्यामध्ये जात किंवा राजा-महाराजांच्या दरबारात जात, तेव्हा आपल्या गोड बोलण्याने व वाक्चातुर्याने सर्वांच्या आकर्षणाचे केंद्र बनत असत. सर्व त्यांना मान देत. त्यांच्या बोलण्यात हास्य-विनोदांचीही पाखर असे.

जेव्हा त्यांनी फकिरीबाणा स्वीकारला, तेव्हा ते सर्व गोष्टींचा त्याग करून बाजूला झाले. आपला सर्व थाटमाट सोडून देऊन फक्त एका धोतरावर उघडे राहू लागले. धोतराचा सोगा आपल्या खांद्यावर किंवा डोक्यावर घेत असत. तरीही आपल्या प्रभावी व्यक्तित्वामुळे व आपल्या अंगच्या शक्तीमुळे भक्तजन मग तो



गरीब असो की श्रीमंत, साधू-संन्यासी असो की गृहस्थ-सर्वजण प्रभावित होत असत.

इतकेच काय हिंस्र पशूसुद्धा दबून जात. नर्मदा-परिक्रमेच्या वेळी एक भयंकर वाघ त्यांच्या तीक्ष्ण नजरेमुळे बिचकून निघून गेला. नर्मदेच्या डोहात त्यांनी उडी घेतली तेव्हा हिंस्र मगरी त्यांच्या जवळसुद्धा फिरकल्या नाहीत. ओंकारेश्वराच्या ओसरीत पंचमुखी नागाने त्यांना विळखा घातला, परंतु त्यांनी "जा" असे म्हणताच तो गप्प निघून गेला. भालचंद्र पर्वताच्या (देहू) पायथ्याच्या जुन्या शिवमंदिरातील काळा नाग, ते तेथे जाताच तेथून निघून गेला. नर्मदा किनाऱ्याच्या त्रिशूलपाणीच्या जंगलात जेव्हा रस्ताच समजत नव्हता, तेव्हा एकदा लांडग्याने त्यांना वाट दाखविली.

**औदार्य**

श्रीमहाराजांच्या मनात फार उदारता होती. त्यांच्या घरी अनेक आश्रित येत. त्या सर्वांचे ते प्रेमाने पालन करीत. कुठे बाहेरगावी गेले की भेट-वस्तू आणून सर्वांना वाटून टाकत. त्या वेळी जर कोणी हजर नसेल तर त्याची वस्तू राखून ठेवत. त्यांच्या औदार्यात समदृष्टी होती.

अनेक भक्त-शिष्य त्यांच्याकडे सेवेसाठी किंवा दर्शनासाठी येत. त्या सर्वांचे योग्यप्रकारे आतिथ्य होत असे. रात्री झोपण्यापूर्वी श्रीमहाराज सर्वांना अंथरूण-पांघरूण मिळाले आहे की नाही हे पाहात असत. श्रीमहाराजांनी लाखो रुपये मिळविले आणि उदार मनाने उडविले. ल. ग. बापट हे प्लेगने आजारी होते आणि त्याच वेळी आईसाहेबही अंथरुणावर पडल्या होत्या. स्वत: श्रीमहाराजही आजारी असताना उठून शिरा, खीर बनवून बापटांना खाऊ घालत. केवढे हे औदार्य.

त्यांनी आपल्या घरी कृष्णा बिवीकर, दामोदर देशपांडे, आण्णासाहेब बहुतुले, निरोखेकर यांसारख्या लोकाना आणून ठेवले होते. त्यांनी दामोदर देशपांडे व दत्तोपंत निरोखेकर यांचा विवाह थाटात करून दिला. सद्गुरू श्रीमहाराजांच्या औदार्याला सीमा नव्हती.

**मातृभक्ती**

श्रीमहाराज हे मातृभक्त होते. ते आईचा शब्द कधी मोडत नसत. त्यांना

चांगल्या घरच्या मुली सांगून आल्या होत्या, परंतु त्यांनी आईच्या पसंतीच्या मुलीशीच लग्न केले. ते आपल्या लोकांना सांगत असत की, "आई-वडिलांच्या सेवेमुळे भगवंत प्रसन्न होतो. भक्त पुंडलिकाच्या मातृ-सेवेमुळे पांडुरंग प्रसन्न झाला."

**धार्मिकता**

श्रीमहाराज फार धार्मिक होते. कुलाचार, पूजा, पाठ, अभिषेक, लघुरुद्र, उत्सव इत्यादी ते मोठ्या प्रेमाने साजरे करीत. भालचंद्र डोंगराच्या पायथ्याशी असलेल्या शिवमंदिरातही त्यांनी ब्राह्मणांकडून लघुरुद्र करविला. घरात पूजा-पाठ ब्राह्मणांकडून होत असे, परंतु श्रीमहाराज स्वत: आपल्या हाताने माळा गुंफून देवांच्या तसबिरींना घालत असत. अन्न-संतर्पणाविषयी त्यांना फार आस्था होती. त्यांच्याकडे आलेल्या भक्त-शिष्यांसाठी भोजनाची व्यवस्था होती. अनेक सणावारी महाप्रसाद होत असे. नाशिकच्या दत्तमंदिराच्या स्थापनेचे वेळी अनेक दिवस महाप्रसाद चालला होता.

बाह्य अवडंबरापेक्षा मनातील धार्मिकतेस मोठी मानत असत. मनात भक्तिभावना नसेल, तर कोणतेही धार्मिक कृत्य म्हणजे निव्वळ कवायत आहे, असे ते मानीत असत. वैराग्य धारण केल्यानंतर त्यांनी हीच खरी धार्मिकता बाणवली. वेदांचे रक्षण करणाऱ्या ब्राह्मणांना ते पूज्य मानीत.

**भक्तवत्सलता**

श्रीमहाराज आपल्या शिष्यांच्या-भक्तांच्या कल्याणाची नेहमी काळजी घेत. त्या सर्वजणांनी ऐहिक व पारमार्थिक कल्याण साध्य करावे म्हणून त्यांना व्यावहारिक बारकावे समजावून सांगत. बाजारात माल कसा खरेदी करावा? त्याची पारख कशी करावी? घासाघीस कशी करावी? साध्या भाजीचीसुद्धा खरेदी करताना कोणती काळजी घ्यावी, इत्यादी सर्व गोष्टी ते समजावून देत. यात चूक झाल्यास रागावून शिव्यांचा भडिमार करीत. अगदी त्याला रडवीत असत. आपल्या लोकांतील अवगुण व दोष पाहून त्यांना संताप येई.

आपल्या शिष्यांच्या खाण्या-पिण्यावर त्यांच्या विश्रांतीवर ते लक्ष देत. आपल्या लाडक्या शिष्यांचा, श्रीबाबामहाराज सहस्रबुद्धे यांचा हट्ट पूर्ण करण्यासाठी



त्यांनी परलोकी गेलेल्या आईसाहेबांना साकार प्रकट केले. भक्तांसाठी ते गुरुमाऊली होते. ते असे सद्गुरू होते की, ज्यांच्या विषयी महात्मा कबीरांनी म्हटले आहे की, गुरु कुम्हार सीख कुंभ है, गढ़ गढ़ काढ़ै खोट।

**भोगी-त्यागी : सीमा ओलांडून असीम**

आपल्या अंग मेहनतीने व नशिबाने श्रीमहाराजांनी धंद्यात लाखो रुपये मिळविले. त्यांच्या डोक्यात पैसा मिळविण्याचा लोभ शिरला होता, परंतु जे काही मिळविले ते मेहनतीने आणि प्रामाणिकपणे मिळविले, कुणाचा विश्वासघात करून नव्हे. सराफाचा आणि सुगंधीचा धंदा केला. एवढेच काय किमयासुद्धा मिळविली. इतका सर्व पैसा चैन करण्यात उडवून दिला. ते म्हणत असत की, "मी असे भोग घेतले आहेत की तुम्ही त्यांचे वर्णन कथा-कादंबऱ्यातही वाचले नसेल." नाच-गाणे इत्यादींचे शौक केले आणि जीवनाचा आनंद मिळविला. त्यामुळे मिळालेली बदनामी सहन केली आणि द्रव्याभावाचे दुःखसुद्धा भोगले.

परंतु सद्गुरूंची कृपा लाभताच ते या सर्वांपासून दूर होऊन फकीर बनले. गुरूंनी सांगताच सोने बनविण्याची किमयागिरीही सोडून दिली. जेथे भोगांची सीमा गाठली होती, तेथे त्यागाचीसुद्धा गाठली. तेथेही त्यांना खिन्नता वाटली नाही की चडफड जाणवली नाही. फकिरीमध्येही ते रमून गेले. तेथेही धुंद होऊन एका धोतरानिशी आत्मानंदात मग्न होऊन गेले. जे धोतर नेसत होते, त्यातलेच अर्धे पांघरत असत. नर्मदा-परिक्रमेमध्ये ते भूक-तहान, थंडी-ऊन सोसत राहिले. कोणतीही तक्रार नाही. बेचैनी नाही. त्यागामध्येसुद्धा ते हद्द सोडून बेहद्द बनले, सीमा ओलांडून असीम झाले. भोगातून त्यागी, रागातून विरागी, मोहातून निर्मोही बनण्यास जरासुद्धा त्यांना वेळ लागला नाही. महाठगिणी मायेचे बंधन त्यांनी एका झटक्यात तोडून टाकले आणि सर्व सोडल्यावर त्यांनी कधी मायेला जवळ फिरकू दिले नाही.

**मोहाचे क्षण**

श्रीबीडकर महाराज यांच्या जीवनात जेव्हा चांगले संपन्न दिवस होते, तेव्हा ते मोहामध्ये डुंबत राहिले. पैशाच्या मस्तीमध्ये भोगसुद्धा भोगले. बदनामी सहन केली, परंतु सद्गुरूंचा अनुग्रह होताच त्यांनी सहजासहजी मोहाच्या जाळ्यातून

स्वत:ला मुक्त करून घेतले. नर्मदा परिक्रमेच्या वेळी एका महंताच्या अत्यंत सुंदर मुलीने त्यांना मंत्र-वश करण्याचा प्रयत्न केला. त्यांच्याशी लग्न करण्याची इच्छा दाखविली. स्वत:ला आणि आपल्या पित्याचा संपन्न मठ त्यांच्या चरणी समर्पित करण्याची तयारी दाखविली, परंतु श्रीमहाराज ढळले नाहीत. जेव्हा ते आळंदीला ज्ञानेश्वर माऊलीच्या दर्शनास गेले, तेव्हा एका अनिंद्य सुंदरीने आतिथ्य स्वीकारण्याची विनंती केली. अशाचप्रकारे देहूमध्येसुद्धा प्रल्हाद नावाच्या माणसाच्या दुसऱ्या बायकोने त्यांच्यावर मोहिनी टाकण्याचा प्रयत्न केला, परंतु श्रीमहाराज निर्द्वंद्व राहिले. विरागी जीवन स्वीकारल्यानंतर कामिनीची कामना त्यांना स्पर्श करू शकली नाही. गृहस्थाश्रमात राहूनही त्यांच्यापाशी असलेला मनोनिग्रह हा त्यांच्या चरित्रास अत्युच्च शिखरावर नेऊन ठेवतो.

**अदम्य साहस**

कोणतेही आव्हान उभे ठाकले की श्रीमहाराजातील अदम्य साहस प्रकट होई. निर्भयता आणि सहनशीलता यांच्यामुळे कोणतेही धाडस ते सहजपणे करीत. अक्कलकोटमध्ये जेव्हा ते सद्गुरूंचे पाय चेपत होते. तेव्हा अचानकपणे श्रीस्वामी समर्थांच्या गुडघ्यामधून भयंकर नाग निघाला आणि फूत्कारू लागला, तरीही ते निर्भयपणे सद्गुरूंची सेवा करीत राहिले. ते पाहून श्रीस्वामी समर्थ संतापून म्हणाले, “तू मोठा जिन्न, राक्षस आहेस.” त्यांच्या या धाडसीपणामुळे त्यांनी प्रसन्न होऊन थोबाडीत मारली व शक्तिपात-दीक्षा दिली. सद्गुरूंनी जेव्हा गुरुदक्षिणा म्हणून किमयागिरी सोडण्याची मागणी केली, तेव्हा मोठ्या धाडसाने ती मान्य केली. सद्गुरूंनी त्यांना नर्मदा-परिक्रमा करण्यास सांगितले, तेव्हा ते नि:संग बनून थंडी-वारा, ऊन, पाऊस, विघ्न, संकटे यांची पर्वा न करता चालू लागले. अनेक संकटे पार करीत पुढे जात राहिले. तीव्र अशी तहान-भूक सहन केली. कडक उन्हात भाजून टाकण्याऱ्या वाळूमध्ये आणि टोकदार पाषाणांवर चालत राहिले.

फत्तरगीर गोसाव्याने गांज्याची चिलीम पुढे केली, तेव्हा असा दम मारला की चिलमीतून ज्वाळा बाहेर पडली. हट्टी भक्ताला चंद्रशेखर बाण देण्यासाठी मगरींनी भरलेल्या डोहात उडी मारली, नाग असलेल्या ओसरीमध्ये झोपले, गयेमध्ये चंडोलची चिलीम एका दमात ओढली, अशी अनेक कृत्ये त्यांनी करून



दाखविली. त्यामधून त्यांची साहसीवृत्ती व अपार सहनशीलता दिसून येते.

**दयाळूपणा**

श्रीमहाराज आपल्या भक्तांवर दया दाखवीत. परदु:ख पाहून त्यांचे मन द्रवित होत असे. नर्मदेच्या किनारी मूळव्याधीने त्रस्त झालेल्या गुजराथी ब्राह्मणास पाहून त्यांना दु:ख झाले व त्यांनी त्याचा रोग स्वत: स्वीकारून त्याला रोगातून मुक्त केले. या आजाराचे दु:ख त्यांना जन्मभर भोगावे लागले.

गोदूताई केतकर या आपल्या मरणोन्मुख असलेल्या नातवाला घेऊन आल्या, तेव्हा त्यांनी भरपूर शिव्या दिल्या, परंतु त्या मुलाची अवस्था पाहून ते द्रवित झाले व त्याच्यावर कृपा-दृष्टी टाकली. तो बरा झाला.

लक्ष्मण गणेश बापट हे श्रीमहाराजांच्या मठातच प्लेगने फार आजारी पडले. तेव्हा स्वत: आजारी असतानाही त्यांनी कृपाळू बनून त्यांची सेवा केली. शेवटी त्यांना मृत्यूच्या दाढेतून वाचविले.

प्राकृत गुणांना मर्यादा असते. श्रीबीडकर महाराज ती मर्यादा उल्लंघून गुणातीत झाले होते. अनंत गुण-संपन्न असे सद्गुरू बनले होते.

* * *

**श्रीरामानंद उवाच**

शरीराची ममता हीच दुस्तर माया होय. निश्चयाने आणि प्रेमात भगवंताचे ध्यान केल्याने धैर्य वाढते. अभ्यासामुळे सर्व साध्य होते, म्हणून प्रयत्न करीत राहिले पाहिजे, तेव्हा कुठे कधी ना कधी मुक्कामावर पोहोचता येईल.

# १५. निश्चल पद

**सत्पुरुषांकडून सन्मान**

श्रीबीडकर महाराज हे मन:शांतीसाठी गुरूच्या शोधार्थ जेव्हा अक्कलकोटमध्ये आले, तेव्हा अक्कलकोटचे श्रीस्वामी समर्थ राजवाड्याच्या तटावरून उडी टाकून त्यांना दर्शन देण्यासाठी बाहेर आले. त्यांना पाहून श्रीस्वामी समर्थ म्हणाले की, "आंबा पाडाला आला आहे." आणि त्यांचा आधिकार व भक्तिभाव पाहून शेवटी श्रीस्वामींनी त्यांना शक्तिपात दीक्षा दिली.

त्यानंतर नर्मदा-परिक्रमेच्या वेळी एका गुहेमध्ये एक मोठे सिद्ध-पुरुष भेटले. त्यांनी श्रीमहाराजांना मोठ्या प्रेमाने दोन दिवस आपल्याजवळ ठेवून घेतले. त्यांची खरी ओळख पटताच नर्मदेच्या तटावरील टेकडीवरील गोसावी, फत्तरगीर बाबा, साने स्वामी व पुण्यात आलेला मुरलीवाला साधू इत्यादी साधूंनी श्रीमहाराजांना मान दिला. गयेमधील चंडोलकस मांत्रिक त्यांचा शिष्य बनला. हुपस्वामी, अवधूतबाबा, शेगावचे गजानन महाराज, पुण्याचे जंगली महाराज, नाशिकचे बंगाली साधू, गोपाळबुवा, काशीचे कृष्णानंद, अजगरस्वामी, शिरडीचे साईबाबा, त्र्यंबकेश्वरचे जहागिदारबुवा इत्यादी तत्कालीन साधु-सत्पुरुष श्रीबीडकर महाराजांना भगवद्स्वरूप मानून मोठा मान देत असत. साधूचे स्वरूप साधूच जाणतो.

**नर्मदामातेची कृपा**

श्रीमहाराज हे अधिकारी पुरुष होते व श्रीस्वामी समर्थांचा अनुग्रह मिळाल्यावर त्यांचा पारमार्थिक अधिकार शिखरावर पोहोचला होता. त्यामुळे परिक्रमेच्या प्रसंगी जेव्हा ते तहान-भूकेने व्याकूळ झाले होते. तेव्हा प्रत्यक्ष नर्मदामातेने गवळणीचे रूप घेऊन त्यांना दूध दिले. ते दूध पिताच त्यांचा थकवा दूर झाला. पायाच्या जखमा बऱ्या झाल्या. ती पाहता-पाहता अदृश्य झाली.



परिक्रमा पूर्ण झाल्यावर श्रीमहाराज ओंकारेश्वरला आले, तेव्हा ओसरीत झोपले होते. कोणी सिद्धपुरुष आला आहे आणि आपणाला जेवण घालील, या आशेने तेथील साधु-गोसावी जमले होते. श्रीमहाराजांना जाग येत नव्हती आणि साधू लोक उतावळे होऊन वाईट-साइट बडबडत होते. त्यांना पैशाविना खाऊ कसे घालता येणार? तेव्हा प्रत्यक्ष नर्मदामाता प्रकट झाली आणि तिने आपले सुवर्ण कंकण काढून त्यांच्या अंगावर टाकले. विजेप्रमाणे ती आली आणि निघून गेली. तेथे जे अधिकारी साधू होते, त्यांना तिचे दर्शन झाले.

दोन वेळा नर्मदा प्रकट होऊन तिने श्रीमहाराजांचेवर कृपा केली. याचा अर्थ श्रीमहाराजांचा अधिकार मान्य करून तिने त्यांचा मान राखला. आपल्या वात्सल्याचा वर्षाव केला.

**देवांनी आपले मानले**

श्रीमहाराजांचा अधिकार मान्य करून अनेक देवांनी त्यांना आपले मानले. आपले स्वरूपच मानले. जेव्हा श्रीमहाराज काशीमध्ये होते. तेव्हा खालच्या मजल्यावर शिव-भक्त पांडुरंगभट भडकमकर राहात होते. त्यांच्या बायकोने शिवाला शिवा-मूठ अर्पण करण्याचे ठरविले होते, त्या वेळी भगवान शिवाने त्या दोघांच्या स्वप्नात येऊन सांगितले की, "तुम्ही जेथे राहाता त्याच्यावरच्या मजल्यावर मी स्वत: राहातो. तेथे राहणाऱ्याला शिवामूठ अर्पण केल्यास ती मला मिळेल." प्रत्यक्ष शिवाने श्रीमहाराजांना आपले अभिन्न रूप मानले.

अशाचप्रकारे श्रीमहाराज हे श्रीज्ञानेश्वर महाराज यांच्या दर्शनासाठी आळंदीला निघाले, तेव्हा तेथे अनुष्ठान करणाऱ्या भक्ताच्या स्वप्नात येऊन ज्ञानेश्वर महाराजांनी सांगितले की, "तुझ्या अनुष्ठानासाठी मी उद्या सकाळी १० वाजता येत आहे. माझ्या स्नानाची व भोजनाची चांगली सोय कर." त्या भक्ताने श्रीमहाराजांना श्रीज्ञानेश्वर महाराज समजून मोठ्या भावाने आतिथ्य केले. श्रीज्ञानेश्वर महाराजांनी त्यांना स्वत:शी अभिन्न मानले.

श्रीमहाराज जेव्हा ज्योतिबाच्या दर्शनासाठी गेले, तेव्हा प्रत्यक्ष ज्योतिबा देवाने तेथील पुजारी गोविंद खट्याळ याला स्वप्नात येऊन सांगितले की, "माझा भक्त पत्नीसह कोल्हापूरहून येत आहे. त्याची चांगली सोय कर." तसेच प्रत्यक्ष

ज्योतिबादेव सरदाराच्या रूपाने घोड्यावर बसून धर्मशाळेत आला आणि त्याने आईसाहेबांना निरोप दिला की, "मी महालक्ष्मीच्या दर्शनासाठी कोल्हापूरला जात आहे. संध्याकाळी परत येईन, तेव्हा तुम्ही या." .

लहानपणी श्रीमहाराज पंढरपूरला पांडुरंगाचे दर्शनासाठी वारीबरोबर एकटे गेले होते, तेव्हा तेथील गर्दी पाहून ते गोंधळून गेले व रडू लागले. एका खेडवळ दिसणाऱ्या माणसाच्या रूपात येऊन पांडुरंगाने त्यांना आत नेले व दर्शन घडविले. नंतर एका भक्ताने सांगितले की, "तो माणूस प्रत्यक्ष पांडुरंग होता. तू मोठा भाग्यवान आहेस."

महाराज जेव्हा देहूजवळील भालचंद्र डोंगराच्या पायथ्याशी असलेल्या निर्जन शिवमंदिरात गेले होते, तेव्हा प्रत्यक्ष भगवान शंकर यांनी जगन्माता पार्वतीसह प्रकट होऊन त्यांना दर्शन दिले.

तसेच ते भालचंद्र डोंगरावर गेले, तेव्हा एका त्रिशूलधारी अवधूताच्या रूपात भगवान शंकरांनी प्रकट होऊन उपदेश दिला की, "सर्व योगाची परिसीमा मीच आहे, सर्व विश्वामध्ये मीच भरून राहिलो आहे, माझ्याशिवाय या जगात दुसरे कोणीही नाही, हे तथ्य जाणल्यावर श्रीज्ञानेश्वर किंवा श्रीतुकाराम वेगळे कोठे आहेत ? असा उपदेश करून तो शिवस्वरूप अवधूत परत गेला.

नर्मदा-परिक्रमेचे वेळी टेकडीवरील गोसाव्याने कडक उन्हात श्रीमहाराजांना पाणी आणण्यास पाठविले होते, तेव्हा त्या गोसाव्याचे आराध्य दैवत असलेल्या श्रीगोपाळकृष्णाने त्याला धमकावले की, "मला पाणी आणण्यास पाठवितोस काय ?"

अशा प्रकारे प्रत्यक्ष अनेक देवांनी श्रीमहाराजांना आपलेच अभिन्न रूप मानले होते. अध्यात्माच्या अत्युच्च शिखरावर पोहोचून श्रीमहाराज प्रत्यक्ष परमात्म-स्वरूप बनले होते.

**सद्‌गुरूंच्याबद्दल निष्ठा**

भगवान श्रीदत्तात्रेयाचे अवतार असलेल्या अक्कलकोटनिवासी श्रीस्वामी समर्थ यांना श्रीमहाराजांनी आपले सद्‌गुरू मानले होते. जेव्हा ते प्रथमत: अक्कलकोटला गेले होते, तेव्हा गुरुदर्शन झाल्याशिवाय अन्नग्रहण करणार नाही



असा संकल्प केला होता. त्या वेळी श्रीस्वामी समर्थ राजवाड्यात गेले होते. तेथे गेल्यावर ते १५-१५ दिवस मुक्काम करीत, परंतु श्रीमहाराजांनी आपला संकल्प सोडला नाही. त्यांची ही निष्ठा पाहून श्रीस्वामी समर्थ हे राजवाड्यातील सेवकांनी थांबविण्याचा प्रयत्न केला, तरी न ऐकता तटावरून उडी घेऊन बाहेर आले आणि त्यांची पूजा स्वीकारली. श्रीस्वामी समर्थ यांच्यासारखा गुरूसुद्धा या भक्ताला भेटण्यासाठी स्वत:ला आवरू शकला नाही. या पहिल्या भेटीतच श्रीमहाराजांना सद्‌गुरूंचेबद्दल प्रेम निर्माण झाले व त्यांनी त्यांना आपली निष्ठा अर्पण केली.

दुसऱ्या वेळी जेव्हा श्रीमहाराज दर्शनासाठी अक्कलकोटला गेले, तेव्हा श्रीस्वामी समर्थांनी कठोर परीक्षा घेतली. श्रीमहाराज त्यांचे पाय चेपत होते, तेव्हा अचानक श्रीस्वामी समर्थांच्या गुडघ्यामधून भयंकर नाग निघून फूत्कारू लागला, तरीही ते विचलित झाले नाहीत. त्यांची निर्भयता पाहून श्रीस्वामी समर्थांनी त्यांना "राक्षस" असे म्हटले आणि थोबाडीत मारून समाधी अवस्थेत पोहोचविले. श्रीमहाराजांना महाप्रसाद करण्यास सांगितले; तेव्हा त्यांनी पैसे नसताना उधार माल घेऊन महाप्रसाद केला. श्रीस्वामी समर्थांनी त्यांना किमयागिरी सोडण्यास सांगितले; तेव्हा मागचा-पुढचा विचार न करता त्यांनी ती सोडून दिली. श्रीस्वामींनी त्यांना नर्मदा-परिक्रमा करण्याची आज्ञा दिली, तर त्यांनी नि:संग बनून ती पूर्ण केली. त्या परिक्रमेमध्ये त्यांना आपले सद्‌गुरू श्रीस्वामी समर्थ यांनी समाधी घेतल्याचे समजले, तेव्हा ते त्यांच्या वियोगामुळे दु:खाने व्याकूळ झाले, परंतु श्रीस्वामी समर्थांनी त्यांना आश्वस्त केले की, "हम गए नहीं, जिंदा हैं।" आणि त्याचा अनुभव देण्यासाठी त्यांनी वाघाच्या रूपाने आणि नंतर सिद्ध योग्याच्या गुहेत प्रकट होऊन प्रत्यक्ष दर्शन दिले. सद्‌गुरूंबद्दल श्रीमहाराजांच्या मनात अपार प्रेम व दृढ निष्ठा होती. आपला अहंकार विसरून ते नित्य गुरुमय बनून राहिले.

श्रीमहाराजांनी स्वत:ला संपूर्णत: सद्‌गुरूंच्या चरणी अर्पण करून टाकले होते. त्यांनी गुरुमाऊलीचे स्मरण करून असंख्य चमत्कार करून दाखविले. गुरूंच्या बळावरच त्यांनी असह्य भयंकर असे देह-प्रारब्ध भोगले. सद्‌गुरूंबद्दलच्या अशा दृढनिष्ठेमुळेच ते जेथे गेले तेथे त्यांनी स्वत:च्या संपूर्ण शक्तींनिशी स्वत:ला झोकून दिले होते. सद्‌गुरूंचा महिमा अनंत असतो. तो आपल्या निष्ठावान शिष्याला

तत्काळ आपल्यासारखा बनवून टाकतो.

श्रीबीडकर महाराजांनी आपल्या जीवनात मानवी शक्यतांची परिसीमा गाठली. त्यांनी अथक उद्यमशीलता दाखविली. उत्कट रसिकतेने जीवनाचा आस्वाद घेतला. धुंद फकीर बनून कठोर वैराग्य भोगले, अखंड ध्यान-योगाने पारमार्थिक अनंतता मिळविली, अहंकार विरून टाकून खऱ्या अर्थाने स्वतंत्रता मिळविली आणि परमेश्वराशी अद्वैत प्राप्त केले. अनेक देवांनी त्यांना आपलेच रूप मानले. मनुष्याच्या सामर्थ्याचा असा उत्कर्ष दुर्लभ होय. साधनेच्या बळावर ते सिद्ध-पुरुष बनले आणि सिद्ध-पुरुषाचे निश्चल ब्रह्म बनले.

**श्रीमहाराजांची परंपरा**

श्रीबीडकर महाराजांचे अगणित शिष्य सर्वत्र विखुरले होते. त्यांमध्ये काशीनाथपंत गर्दे, बाबा गर्दे, वासुआण्णा भागवत, आण्णासाहेब गुप्ते, नारायण रानडे, शिवरामपंत खांडेकर, आठवले, मुकुंदराव मोघे, रावसाहेब सहस्रबुद्धे, बाबासाहेब कर्वे, राहूरकर, गुप्ते वकील, मंगलदास, पुरुषोत्तम पिसोळकर, रघुनाथ कृष्ण टिळक, आण्णासाहेब कराडकर, राम जोशी, शिवशंकर शौचे, दामुआण्णा सोमण, आण्णा कर्वे, द.ल. ऊर्फ दत्तोपंत निरोखेकर, त्रिंबकराव बोडस, रामभाऊ दळवी, ल.ग.बापट, दामोदरपंत देशपांडे, कनौजी ब्राह्मणी, आण्णासाहेब बहुतुले इत्यादी प्रसिद्ध आहेत.

यांपैकी आण्णासाहेब बहुतुले हे पुण्याच्या शनिवार पेठेतील मठाचे उत्तराधिकारी होते. त्यांच्यानंतर वासुआण्णा भागवत व ल.ग. बापट यांनी मठाची व्यवस्था पाहिली. बापट यांनी मराठीत श्रीबीडकर महाराज यांचे चरित्र लिहिले आहे. दामोदर देशपांडे यांनी नाशिकच्या दत्तमंदिराची परंपरा सांभाळली. रावसाहेब ऊर्फ बाबा महाराज सहस्रबुद्धे हे श्रीमहाराजांच्या आध्यात्मिक परंपरेचे खरे वारस होते, ते जगरहाटीपासून अलिप्त होते. कनौजी ब्राह्मणी ही साध्वी होती, ती श्रीमहाराजांचा अनुग्रह मिळाल्यावर साधनारत होण्यासाठी अज्ञातस्थळी निघून गेली.

**दामोदरपंत बहुतुले ऊर्फ आण्णासाहेब**

शिरढोण येथील दामोदरपंत बहुतुले हे श्रीगजाननाचे भक्त होते. दहावीपर्यंत शिकले होते. श्रीगजाननाची ते नित्य सेवा करीत असत. त्यांची आजी हीच त्यांचे



सर्वस्व होती. ती गेल्यावर ते उदास झाले आणि शिरढोणच्या हनुमान मंदिरात जाऊन बसू लागले. हनुमंताने दृष्टांत दिल्यावर त्यांनी घर सोडले व १९०३ मध्ये ते श्रीबीडकर महाराज यांच्या सेवेत रूजू झाले. ते श्रीमहाराजांचे घर सोडून कुठेही जात नसत. मठाची सर्व व्यवस्था आण्णासाहेब बघत असत. श्रीबीडकर महाराजांनी त्यांना आपला उत्तराधिकारी मानले होते. आईसाहेबसुद्धा त्यांना आपला मुलगा मानीत असत. श्रीबीडकर महाराजांनी देह सोडल्यावर पूर्ण बारा वर्षे यांनी मठाची सेवा केली आणि बरोबर बारा वर्षांनी श्रीमहाराजांच्या पुण्यतिथी दिवशीच आण्णासाहेबांनी देहत्याग केला. त्यांचे जीवन सद्गुरूंच्या चरणी अर्पित झालेले होते.

**वासुआण्णा भागवत**

श्रीमहाराजांना काशीमध्ये जे पांडुरंगभट भडकमकर भेटले होते, ते ठाण्यात स्थायिक झाले होते. त्यांच्या निमित्ताने बळवंतराव भागवत हे श्रीबीडकर महाराज यांच्या सहवासात आले. बळवंतरावांच्याबरोबर त्यांचे लहान सावत्र भाऊ वासुआण्णा भागवत हेही श्रीबीडकर महाराजांचेमुळे प्रभावित झाले. सुरवातीला ते ठाण्याहून काही दिवस श्रीमहाराजांच्या सेवेसाठी येत असत. नंतर ते कुटुंबासह श्रीमहाराजांच्या आश्रयास आले. ते वासुआण्णा यांची कठोर परीक्षा घेत. त्यांना इंप्रूव्हमेंट ट्रस्टकडून खूप पैसा मिळाला, परंतु तो सर्व त्यांनी श्रीमहाराजांचे चरणी अर्पण केला. बहुतुले यांच्यानंतर वासुआण्णा मठाची व्यवस्था पाहात होते. ते अधिकारी पुरुष होते.

**आण्णासाहेब गुप्ते**

ठाण्याचे व्ही.जी. गुप्ते ऊर्फ आण्णासाहेब गुप्ते हे बी.ए., एलूएलू.बी.होते. त्यांनी पुण्यात वकिली सुरू केली, पण ती चालेना. मोठे कुटुंब व मिळकत कमी. त्यामुळे ते त्रासून गेले. ते तुळशीबागेत जाऊन श्रीराम व हनुमान यांचे दर्शन घेऊ लागले. डॉ.दत्तोपंत ऊर्फ काकासाहेब निरोखेकर हे त्यांचे मित्र होते. त्यांच्या सल्ल्यामुळे आण्णासाहेब श्रीबीडकर महाराज यांचेकडे येऊ लागले. काही दिवसांतच त्यांना कोर्टामध्ये नाझरची नोकरी मिळाली. पुढे प्रगती होत होत श्रीगुरूंच्या कृपेने मुन्सफदेखील झाले. त्यांची श्रीबीडकर महाराजांच्यावर अढळ निष्ठा होती.

**शिवरामपंत खांडेकर**

नाशिकचे शिवरामपंत खांडेकर हे श्रीमहाराजांचे शिष्य होते. नाशिकचे गोपाळबुवा, मौलाबुवा, त्र्यंबकेश्वरचे जहागिरदार, अवधूतबुवा अशा सत्पुरुषांचा त्यांच्यावर लोभ होता. यांनी पदे, अभंग, आरत्या, अष्टक अशा अनेक रचना केलेल्या आहेत. अवधूतबुवा यांच्याशी त्यांचे फार जमत असे. ते दोघे गोदावरीच्या काठी बसले होते, तेव्हा बुवा म्हणाले, "दुपारच्या जेवणाचे पाहिले पाहिजे." शिवरामपंत म्हणाले, "तुम्ही जिथे बसला आहात, तेथेच राम देणार नाही काय?" बुवा म्हणाले, "राम आम्हाला देईल, पण देह-प्रारब्ध घेऊन बसण्याचा आमचा आधिकार नाही. तो तुमच्या बीडकर महाराजांचा आहे. आम्हाला अजुनी पोटाची चिंता असते."

**आठवले**

नाशिकच्या राजद्रोह प्रकरणापूर्वी आठवले नावाचा एक क्रांतिकारी तरुण श्रीमहाराजांच्यापाशी आला. त्याने विचारले की, "क्रांतीच्या चळवळीला यश येईल काय?" तेव्हा श्रीमहाराजांनी गोष्ट सांगितली की, "एक मुंगळा आपल्या आईला म्हणाला की, आई, आई, मी आज गुळाची एक ढेप पाहिली. उद्या ती मी घरी घेऊन येतो. मग आपले दारिद्र्य दूर होईल." आई त्याला म्हणाली, "तुझी कंबरच तुझा पराक्रम दाखविते. तू इतर हजारो मुंगळ्यांबरोबर ढेपेखाली चिरडून मरशील." श्रीमहाराज आठवलेला म्हणाले, "मूर्खपणा करून नकोस, मरशील." आठवलेला ते आवडले नाही. तो चळवळीत काम करीत राहिला.

काही दिवसानंतर त्याला कल्याण येथे पकडण्यात आले. त्याच्या बॅगेत आक्षेपार्ह गोष्टी आढळल्या. त्याची जबानी घेतली. तेव्हा तो म्हणाला, " महाराजांनी सांगितलेले ऐकले असते, तर ही पाळी आली नसती." पोलिसांनी श्रीमहाराजांचा नाव-पत्ता विचारला. पोलीस श्रीमहाराजांच्याकडे येऊन चौकशी करू लागले. श्रीमहाराजांनी विचारले की, "तो काय म्हणत होता?" तेव्हा पोलीस म्हणाले की त्याने मुंगळ्यांची गोष्ट सांगून म्हटले की, "मी महाराजांचे ऐकले असते तर बरे झाले असते." तेव्हा श्रीमहाराज म्हणाले की, "त्याला माझा निरोप सांगा की या प्रसंगी तुला जशी माझी आठवण झाली, तशी भगवंतांची कर." तो भगवंताचा



धावा करू लागला.

त्याच्या बॅगेत आक्षेपार्ह वस्तू मिळाल्या होत्या, परंतु कोर्टात ती बॅग त्याची असल्याचे सिद्ध झाले नाही. त्यामुळे त्या खटल्यातून त्याची मुक्तता झाली. तो श्रीमहाराजांचा निस्सीम भक्त झाला.

**मंगळदास**

मंगळदास नावाचा एक गुजराथी युवक डॉ. दत्तोपंत निरोखेकर यांचा वसतिगृहातील मित्र होता. तो कृष्णाचा मोठा भक्त होता. तो कृष्ण-भक्तीमध्ये मग्न असे. नंतर तो थिऑसाफीकडे वळला. तो डॉ. दत्तोपंत निरोखेकर यांना सारखा आग्रह करू लागला की तुम्ही थिऑसाफिस्ट व्हा. तेव्हा ते म्हणाले, "मी पूर्वीच गुरू केला आहे." मंगळदासाच्या मनात श्रीमहाराजांचे दर्शन घेण्याची उत्कंठा निर्माण झाली, परंतु तो द्विधा अवस्थेत पडला की त्यामुळे माझ्या कृष्णभक्तीमध्ये बाधा येईल. तेव्हा त्याला स्वप्नामध्ये श्रीमहाराजांनी दृष्टांत दिला की, "अरे, श्रीकृष्ण पाच हजार वर्षांपूर्वी होऊन गेला. मी आज आहे." तेव्हा दुसऱ्या दिवशी ते स्वप्न त्याने निरोखेकरांना सांगितले. तो श्रीमहाराजांच्या दर्शनासाठी पुण्यास गेला आणि त्यांचा भक्त बनला.

**राम जोशी**

ठाण्यातील राम जोशी यांच्या घरात परंपरेने वैद्यकी चालत आली होती. राम जोशी हे पांडुरंग भडकमकर यांच्या ओळखीने श्रीमहाराजांचे शिष्य बनले. त्यांचे मन भाव-भोळे होते. या निर्मळ भावनेमुळे ते प्रसिद्ध वैद्य झाले. मोठमोठे वैद्य व डॉक्टर हात टेकत असत, ते रोगी राम जोशी यांच्या औषधाने बरे होत असत. आईसाहेबांचे ते आवडते होते. ते पुण्यास आले की आईसाहेब म्हणत, "राम जोशी जी पूजा करतो ती माझ्या विठ्ठलाला आवडते." श्रीमहाराज सर्वांना रागावत, पण ते राम जोशींची भक्ती व विनम्रता पाहून त्यांच्यावर रागावत नसत. श्रीमहाराजांच्या कृपेमुळे ते परमार्थातही पुढे गेले.

**शिवशंकर शौचे**

नाशिकचे शिवशंकर शौचे हे आई-वडील व पत्नी निवर्तल्यामुळे उदास झाले होते. त्यात दारिद्र्य. जेव्हा ते श्रीमहाराजांना भेटले तेव्हा श्रीमहाराज म्हणाले,

"विवाह केल्यास सुख मिळेल." ते रोज दर्शनासाठी येऊ लागले. एके दिवशी त्यांनी विचारले की, "मी एकटा जीव आहे. लग्न केल्यास दोन लोकांचे पालन कसे होणार ? जिकडे आग तिकडे फोफाटा." तेव्हा श्रीमहाराज म्हणाले, "हे तुझे स्मशान-वैराग्य आहे. प्रत्येक जण आपले नशीब घेऊन येतो. पहिली बायको मेली, म्हणून दुसरीचे नशीब मेलेले नाही. वासना तीव्र असतात. वैराग्य धारण करून परमार्थ केल्यास फजिती होईल. संसारात राहून सत्यवचन, नम्रता आणि परस्त्री मातेसमान हा निश्चय बाळगल्यास ते व्रतही परमार्थ असते. शुद्ध मनाने आणि लक्षपूर्वक हरिनाम-स्मरण करावे. तेच पलीकडे पोहोचवील." शौचे यांनी श्रीमहाराजांच्या आज्ञेचे पालन श्रद्धेने केले आणि ते सुखी झाले.

**लक्ष्मण गणेश बापट**

यांची घरची गरिबी व नाजुक तब्येत होती. मॅट्रीक झाल्यावर लक्ष्मण गणेश बापट हे पोस्ट खात्यात होते. मन लावून काम करीत ते हेड पोस्ट मास्तर झाले. त्यांची पहिली पत्नी गेल्यावर श्रीमहाराजांनी त्यांचे दुसरे लग्न करून दिले. त्यांनी बापटांना रोज १०मिनिटे नियमितपणे ध्यान करण्याचा उपदेश दिला होता. १९११ साली आईसाहेबांनी देह ठेवल्यावर श्रीमहाराजांनी बापटांना सहकुटुंब मठात येऊन राहण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणे ते मठातील सेवा करू लागले. त्यांना हार्निया, प्लेग व तीन वेळा टाइफॉईड झाला, परंतु श्रीमहाराजांच्या कृपेने वाचले.

ल. ग. बापट यांनी श्रीबीडकर महाराजांचे मराठीमध्ये चरित्र लिहिले आहे. बापट १९३७ पासून १९६० पर्यंत, देह असेपर्यंत श्रीमहाराजांचे मठात व्यवस्थापक होते.

**नाशिकचे कर्वे बंधू**

नाशिकच्या वामनराव ऊर्फ बाबासाहेब कर्वे यांना वकिलीच्या परीक्षेत यश मिळत नव्हते. ते श्रीमहाराजांना शरण आले आणि त्यांच्या कृपेने पास झाले. तेव्हापासून श्रीमहाराजांच्याबद्दल श्रद्धा उत्पन्न झाली. त्यांना श्रीमहाराजांच्या कृपेने लौकिक व पारमार्थिक सुख लाभले.

बाबासाहेबांच्यामुळे त्यांचे चुलत बंधू आण्णासाहेब कर्वे हेसुद्धा श्रीमहाराजांचे शिष्य झाले. आण्णासाहेब हे क्रांतिकारकांच्या सहवासात आले, तेव्हा त्यांना श्रीमहाराजांनी उपदेश सांगितला की, त्यांच्यापासून दूर राहा. त्यांनी हेही सांगितले की, "तू नाशिकमध्ये राहा. कुठे तरी नोकरी कर. एलएल.बी. च्या अभ्यासासाठी मुंबईला जाऊ नकोस." परंतु त्यांनी ऐकले नाही. शेवटी ते नाशिकच्या राजद्रोहाच्या खटल्यात सापडले. खुनाचा आरोप शाबीत झाला व त्यांना फाशीची शिक्षा झाली.

श्रीसद्गुरूंच्याबद्दल श्रद्धा बाळगल्यामुळे बाबासाहेबांना सर्व काही लाभले व श्रद्धा न ठेवल्यामुळे आण्णासाहेबांना फाशी मिळाली.

**रामभाऊ दळवी**

रामचंद्र शंकर दळवी (खेड, ता.वाळवे) हे घरचे सुखवस्तू होते. डॉ.दत्तोपंत निरोखेकर यांचे बंधू नारायण लक्ष्मण निरोखेकर हे दळवींचे मेहुणे होते. एकदा नारायण निरोखेकर त्यांना घेऊन श्रीमहाराजांचेकडे आले. तेव्हापासून ते प्रभावित झाले आणि वेळोवेळी दर्शनासाठी येऊ लागले. दळवी यांच्याकडे पोवाडे रचण्याची प्रतिभा होती. त्यांनी एका हरिदासाकडून उपदेश घेतला. श्रीमहाराजांच्या दर्शनानंतर त्यांची प्रतिभा विकसित झाली आणि शाहीर म्हणून त्यांना प्रसिद्धी मिळाली. त्यांनी श्रीशिवछत्रपतींच्यावर ऐतिहासिक पोवाडा रचला होता.

एकदा ते चार दिवसांसाठी मठात आले होते. परत जायला निघाले. तेव्हा श्रीमहाराजांनी त्यांना थांबवून घेतले. त्यांची आज्ञा त्यांना टाळता आली नाही. रात्री आण्णामहाराज बहुतुले यांना विंचू चावला. फार वेदना येऊ लागल्या. श्रीमहाराज दळवींना म्हणाले की, "तू विंचवाचे विष उतरवशील का ?" दळवींना मंत्र अवगत होता. त्यांनी मंत्र म्हणून विंचू चावल्याजागी राख चोळली. तेव्हा विष उतरले." श्रीमहाराज म्हणाले की, "एवढ्यासाठीच तुला थांबवून घेतले होते." ऐकून दळवींना आश्चर्य वाटले आणि त्यांची श्रीमहाराजांच्याबद्दलची श्रद्धा दृढ झाली.

**मुकुंद पांडुरंग मोघे**

इंदूरचे मुकुंद मोघे हे बळवंतराव भागवतांचे नातेवाईक होते. मोघे यांनी एलएल.बी. करून एलएल.एम.ची परीक्षा दिली होती. भागवतांच्यामुळे श्रीमहाराजांच्या आश्रयास आले. ते क्रांतिकारकांच्यामध्ये सामील होते, परंतु

श्रीमहाराजांनी त्यांना ताकीद दिली होती की तू या भानगडीत पडू नकोस.

तरीही क्रांतीचे आकर्षण असल्यामुळे ते नाशिकच्या राजद्रोहाच्या कटात अडकले. नाशिकचा इंग्रज कलेक्टर जॅक्सन याला ठार मारायचे होते. प्रथम अनंत कान्हेरे गोळी मारणार होता, त्यातून जॅक्सन वाचला तर मोघे गोळी घालणार होते. थिएटरमध्ये जॅक्सन येताच कान्हेरेने गोळी मारली आणि तो मारला गेला. सर्वजण पळाले. मोघे घरी गेले तर पोलीस पकडणार, म्हणून ते लपत-छपत श्रीमहाराजांच्या मठात आले. श्रीमहाराजांनी सर्व ओळखून म्हटले, "जे झाले ते चांगले झाले नाही. प्रत्येकाने आपली कुवत ओळखून काम करावे. फक्त चळवळ करून काही होत नाही. आता आला आहेस, तर इथेच रहा, बाहेर पडू नकोस."

मोघे मठात राहिले, परंतु घरचे लोक काळजी करीत असतील म्हणून त्यांनी पोस्टकार्ड पाठविले व ते नेमके पोलिसांच्या हातात पडले. पोलीस येऊन पुण्याच्या मठातून त्यांना पकडून घेऊन गेले. त्या वेळी मोघे यांनी श्रीमहाराजांना कळवळीची विनंती केली आणि दयेची भीक मागितली. तेव्हा श्रीमहाराज म्हणाले, "जा, सुटशील." मोघे यांना नक्की फाशीची शिक्षा झाली असती. ते तुरुंगामध्ये श्रीमहाराजांचा धावा करीत राहिले. माफीचा साक्षीदार त्यांना ओळखू शकला नाही. संशयाचा फायदा मिळून मोघ्यांची सुटका झाली. श्रीमहाराज निकालापूर्वीच म्हणाले की, "मोघे आल्यावर सांगा."

मोघे तुरुंगातून सुटले, पण जायचे कुठे? त्यांनी श्रीमहाराजांचे दर्शन घेऊन इंदूरला जायचा विचार केला. खिशात पैसाही नव्हता. इतक्यात रस्त्यांमध्ये त्यांच्यासमोर एक काळाकुट्ट माणूस उभा राहिला. इच्छा नसताना, न मागता त्याने पाचाची नोट मोघ्यांच्या खिशात घातली. मोघे पेढे-हार वगैरे घेऊन श्रीमहाराजांच्याजवळ पोहोचले. तेव्हा ते म्हणाले, "अरे, तुला प्रत्यक्ष विठ्ठलाने दर्शन दिले आणि तुला ओळखता आले नाही." मोघे आपल्या भाग्यामुळे रोमांचित झाले.

श्रीमहाराजांनी त्यांना घरी परतण्याची आज्ञा दिली. जाताना भुसावळला खालम्माची भेट घेण्यास सांगितले. ती संत-स्त्री भेटली, तेव्हा तिने मोघ्यांना थोबाडीत मारली व मांडीवर बसवून घेऊन त्यांना भाकरी खाऊ घातली. ती



म्हणाली, "शेर का बच्चा असूनही तू असा का फिरतोस? आकाशात उडी मारली तर पाय मोडेल, घरी जाशील तर पोट भरेल."

इंदूरला गेल्यावर मोघे यांना पैसा अडका, मान-मरातब मिळाला. त्यांनी अध्यात्मातही प्रगती केली. श्रीमहाराजांच्या कृपेमुळे त्यांना प्रपंच व परमार्थात यश मिळाले. ते इंदूरच्या स्टेट मिलमध्ये मोठे ऑफिसर होते.

**गर्दे पिता-पुत्र**

**काशीनाथ गर्दे**

काशीनाथ गर्दे हे ठाण्याच्या बळवंतराव भागवतांचे मेहुणे होते. भागवतांच्या निमित्ताने काशीनाथपंतांना श्रीमहाराजांचे दर्शन झाले. त्यांच्या कृपेने ते वकिलीची परीक्षा पास झाले. तेथे पुण्यात वकिली चालणार नाही, म्हणून त्यांनी विदर्भात जाण्याचा विचार केला, परंतु तेथे सनद मिळण्यात अडचणी आल्या. सनद मिळाली पण वकिली चालली नाही. शेवटी मुन्सफी मिळाली आणि पुढे ते नागपूरला सबजज्ज झाले. श्रीमहाराजांच्या कृपेमुळे स्वार्थ व परमार्थ दोन्हीमध्ये यश मिळाले.

काशीनाथ गर्दे श्रीमहाराजांच्या नित्य दर्शनास जात असत. त्या वेळी श्रीमहाराजांनी सांगितले होते की, "पुण्यात तुझा जम बसणार नाही, तू विदर्भात जा." श्रीमहाराजांचे काशीनाथपंतावर फार प्रेम होते. त्यानी त्यांची परमार्थामध्ये मोठी प्रगती करून घेतली. काशीनाथपंत जेव्हा कोणा साधु-सत्पुरुषाकडे दर्शनासाठी जात असत, तेव्हा ते लोक त्यांचा अधिकार ओळखून त्यांच्यावर प्रेम करीत.

काशीनाथपंत हे शिरडीच्या साईबाबांचे दर्शन घेण्यासाठी गेले, तेव्हा वाकत असतानाच साईबाबा म्हणाले, "या रामदास." श्रीबीडकर महाराज यांच्या रामचंद्र किंवा रामानंद या नावात "राम" होता. साईबाबांनी त्यांना आग्रहपूर्वक आठ दिवस आपल्याजवळ ठेवून घेतले.

काशीनाथपंत हे शेगावच्या गजानन महाराज यांच्या दर्शनास १९०५ मध्ये गेले, तेव्हा गजानन महाराजांनी त्याच्या पाठीवर हाताचा कोपरा मारला. ते घरी परत आले, तेव्हा त्याना मुन्सफीच्या नेमणुकीची तार मिळाली. दुसऱ्यांदा १९१० मध्ये गेले तेव्हा गजनानन महाराजांनी काशीनाथपंताचा शर्ट-कोट काढून

घेऊन आपले सर्व अंग पुसले व ते कपडे परत दिले. महाराजांच्या रज:कणांनी पवित्र झालेली वस्त्रे मिळाल्यामुळे काशीनाथपंतांना कृतार्थ वाटले.

काशीनाथपंत एलिचपूरचे सत्पुरुष शंकर भटजी याना भेटण्यास गेले, तेव्हा ते त्यांचे स्वागत करण्यासाठी रस्त्यावर उभे होते. त्यानी विठ्ठल मंदिराचा सभामंडप स्वत: स्वच्छ करून बैठक घातली. त्यांनी काशीनाथपंतांना मांडीवर बसवून त्यांचे चुंबन घेतले आणि म्हटले, "तुम्ही दुनियेचे मुन्सफ आहात. काळजी करू नका भगवंत कृपा करील."

काशीनाथपंत एकदा जालन्यास गेले. त्या वेळी देव शिरस्तेदार होते. काशीनाथपंत म्हणाले, "संतांचे दर्शन घेण्याची योग्यता माझ्यामध्ये नाही." तेव्हा देव शिरस्तेदार म्हणाले, "मुन्सफसाहेब, पुन्हा कधी असे म्हणू नका. तुम्ही आमच्यामधील आहात. अजुनी वेळ आहे. वेळ येताच तुम्हाला चमत्कारच चमत्कार चोवीस तास दिसतील; काळजी करू नका. सर्व कल्याण होईल."

काशीनाथपंत ग्वाल्हेरला एका अवलिया नग्न साधूच्या दर्शनास गेले. ते साधू चढायला फार अवघड अशा तिसऱ्या मजल्यावर राहात होते. दर्शनाला येणाऱ्यावर ते दगड मारीत. काशीनाथपंत हे धीर धरून त्यांच्याजवळ गेले. तेव्हा ते अवधूत त्यांच्याकडे पाहातच राहिले. त्यानी पाठीवर शाबसकी देत म्हटले, "बेटा, तुमको सब है। सुन्ना है, चाँदी है, मोती है, माणिक है। तुम्हारे ऊपर ऊपरवाला राजी है। ऊपरवाला कैसा झमकता है देखो।"

काशीनाथपंत पुण्यास येता-जाताना भुसावळच्या खालम्माला भेटण्यास जात. ती मोठ्या प्रेमाने त्यांना बसवून बोलत असे.

**बाबा गर्दे**

काशीनाथपंतांचे वडील बाबा गर्दे हे महाराष्ट्रातील प्रकांड वेदान्ती होते. त्यांचे गीतामृत शतपदी व पंचदशी हे ग्रंथ त्यांच्या विद्वत्तेचे साक्ष देतात. ते मोठे वेदान्ती होते, परंतु पारमार्थिक उन्नती करून घेण्यासाठी श्रीमहाराजांची कृपा मिळविण्याची त्यांची इच्छा होती. त्याना आपल्या विद्वत्तेचा अहंकार होता, म्हणून श्रीमहाराज त्याना शिव्या देत असत. एकदा त्यांनी श्रीमहाराजांचा अनुग्रह प्राप्त करण्यासाठी धरणे धरले, तेव्हा श्रीमहाराज म्हणाले, "श्रद्धावान् लभते



ज्ञानम् ।" ते बाबा गर्दे यांची कोरडी विद्वता पाहून त्याना आत्मघाती असे म्हणत. एकदा काशीनाथपंत आपल्या वडिलांना म्हणाले, "ते तुम्हाला शिव्या देतात, मग तुम्ही त्यांच्याकडे का जाता?" तेव्हा बाबा गर्दे यानी उत्तर दिले की, "ते आम्हाला शिव्या देवोत, आत्मघाती किंवा मूर्ख म्हणोत, परंतु आमच्यासाठी ते विश्रांतिस्थान आहेत, ते आम्हाला आपल्याकडे खेचून घेतात. त्यांच्याजवळ कसली जादू आहे कोणास ठाऊक."

एकदा खुद्द बाबांनी श्रीमहाराजांना विचारले, "तुम्ही मुलाना आपले मानता, मग तुम्हाला आम्ही आत्मघाती का वाटतो?" तेव्हा श्रीमहाराज हसून म्हणाले की, "तुम्ही जगाचे गुरुत्व घेतले आहे. ते सुटल्याशिवाय आमचे चालत नाही. एका म्यानामध्ये दोन सुऱ्या राहू शकत नाहीत." काशीनाथपंतांनी श्रद्धेच्या जोरावर श्रीमहाराजांची कृपा मिळविली, परंतु त्यांचे वडील विद्वत्तेच्या अहंकारामुळे त्यापासून वंचित राहिले.

* * *

**श्रीबीडकर महाराजांची भविष्यवाणी**

स्वातंत्र्य मिळाल्यावरही जर धर्माचे पुनरुज्जीवन झाले नाही, तर अतिवृष्टी, अनावृष्टी, भूकंप, ज्वालामुखी, वादळे, महापूर, दुष्काळ, साथीचे रोग इत्यादी संकटे येतील आणि लोक त्रस्त होऊन जातील. शेवटी लोक पुन्हा धर्माकडे वळतील आणि सत्यनिष्ठा (दानत) येईल, तेव्हाच हिंदूंचे नष्टचर्य संपेल, तेव्हाच ते सर्व जगाचे गुरू बनण्यास समर्थ होतील. "धर्म एव हतो हन्ति। धर्मो रक्षति रक्षित:।" हेच आमचे ब्रीद आहे. जे लोक याला चिकटून राहतील, त्यांचे रक्षण आम्ही कोणत्याही परिस्थितीत करू, हीच आम्हा साधु-संतांची कामगिरी होय आणि तीच आम्ही या दृश्यादृश्य सृष्टीमध्ये करीत असतो.

# १६. संप्रदायाची परंपरा

## अक्कलकोटनिवासी श्रीस्वामी समर्थ महाराज
## श्रीबीडकर महाराज यांचे सद्‌गुरू

इ.स.१२७५ च्या जवळपास कारंजानगरीमध्ये माधव व अंबाभवानी या सदाचारी व सच्छील माता-पित्याच्या घरी श्रीदत्तात्रेयाने श्रीमत् नृसिंहसरस्वतींच्या रूपाने अवतार घेतला. ते बालक जन्मत: फक्त ओंकाराचेच उच्चारण करीत होते. आई-वडील काळजीत पडले की हा मूक तर नाही? परंतु मुंज केल्यावर तो धडाधड वेदांचे पठण करू लागला. मोठमोठे शास्त्री-पंडित ते पाहून चकित झाले.

त्यांनी काशीमध्ये तपस्या करण्यासाठी गृहत्याग केला. तेथे वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध श्रीकृष्ण सरस्वती होते. त्यांच्याकडून यांनी संन्यासाश्रमाची दीक्षा घेतली. असंख्य अद्‌भुत लीला करून त्यांनी अगणित भक्तांचा उद्धार करीत मोठमोठ्या ज्ञानी व योगी पुरुषांना उपदेश दिला.

श्रीक्षेत्र गाणगापुरात बरेच दिवस निवास केल्यानंतर भक्तांच्या हितासाठी त्यांनी तेथे आपल्या निर्गुण पादुका स्थापन केल्या व ते पाताळगंगेच्या तटावर आले. त्यांनी आपल्या शिष्यांना एक पुष्पासन बनविण्याची आज्ञा केली. त्या आसनावर बसून श्रीमत् नृसिंहसरस्वती हे प्रवाहाच्या विरुद्ध दिशेने नदीच्या उगमाकडे कदलीवनात गेले.

त्यांनी कदलीवनात अंदाजे दीडशे वर्षे तपस्या केली. त्यानंतर त्यांनी जावा, सुमात्रा, इंडोनेशिया, चीन, जपान, ऑस्ट्रेलिया यांसारख्या देशात संचार करून अनेक जीवांचा उद्धार केला. ते नंतर तिबेटला आले. तेथील हिमाच्छादित शिखरांवर भ्रमण करीत त्यांनी तेथे शतकानुशतके तपश्चर्येद्वारे देह-कष्ट करीत असलेल्या तपस्वियांचा उद्धार केला.

त्यानंतर श्रीनृसिंहसरस्वती हे हिमालयातील एका देवदार वृक्षाखाली



तपस्या करीत बसले. नंतर जवळजवळ अडीचशे वर्षांनी एका लाकूडतोड्याच्या निमित्ताने वारुळातून प्रकट झाले. अनेक वेळा ते लंकेपासून हिमालयापर्यंत परिभ्रमण करीत व अनंत लीला दाखवीत गेले. त्यांना ठिकठिकाणी वेगवेगळ्या नावांनी ओळखत असत. कुठे त्यांना दिगंबरस्वामी, तर कुठे चंचलभारती असे म्हणत. ते मुंबईला बारा वर्षे राहिले. तेथून मंगळवेढा, राजुरी, मोहोळ आणि सोलापूरात राहून शेवटी १८५७ ला अक्कलकोट संस्थानात आले. तेच श्रीस्वामी समर्थ या नावाने अक्कलकोटला आल्यावर प्रसिद्ध झाले. यांच्या भक्त-मंडळींमध्ये सर्व जाती-धर्माचे लोक होते. श्रीस्वामी समर्थांच्या निवासामुळे अक्कलकोट हे तीर्थक्षेत्र बनले. त्यांच्या केवळ दर्शनाने हजारो भक्तांच्या मनोकामना पूर्ण होत असत. “श्रीगुरु-लीलामृत” नावाचा प्रासादिक ग्रंथ हा श्रीस्वामी समर्थ यांचा लीला-चरित्र म्हणून प्रसिद्ध आहे. श्रीदत्तात्रेयांप्रमाणे स्वामी समर्थांच्या स्मर्तृगामित्वाची प्रचिती सुरवातीपासूनच येत होती. पुण्याचे श्रीबीडकर महाराज, शिरडीचे साईबाबा, पुण्याचे शंकर महाराज, शेगावचे गजानन महाराज, श्रीदेव मामलेदार (नाशिक), श्रीबाळाप्पा महाराज, श्रीचोळाप्पा महाराज (अक्कलकोट), श्रीनृसिंह सरस्वती (आळंदी) यासारखे अनेक शिष्य त्यांनी निर्माण केले. अक्कलकोट संस्थानचे राजे मालोजीराव हे त्यांचे भक्त होते.

श्रीस्वामी समर्थांच्या प्रत्येक कृतीमध्ये भक्तांना गूढ अशी पूर्व सूचना मिळत असे. श्रीमंती व सत्ता यांच्या मस्तीचा त्यांना तिरस्कार वाटे. ते उपासकांना म्हणत असत की, “सागर भरलेला आहे. जितका घेता येईल तितका घ्या किंवा शेत पिकवा आणि खा.” शुष्क पांडित्याचा मिथ्याभिमान बाळगून कोणी जर त्यांच्याजवळ आला तर ते त्याचे पितळ उघडे करीत. अक्कलकोटमध्ये त्यांनी चैत्र वद्य १३, शक १८००; मंगळवार, दि. ३० एप्रिल १८७८ या दिवशी आपल्या सहाशे वर्षांच्या पुरातन अवताराची समाप्ती आपल्या आवडत्या वटवृक्षाखाली केली. त्यांनी म्हटले आहे की, “आम्ही गेलो नाही, जिवंत आहोत.” या आश्वासनाचा प्रत्यय भक्तजनांना आजही वारंवार येतो. श्रीस्वामी समर्थांनी श्रीबीडकर महाराज यांना आपला स्वरूप संप्रदाय चालविण्याची आज्ञा केली.

***

## श्रीबीडकर महाराजांचे शिष्योत्तम
## श्रीसद्‌गुरू बाबा महाराज ऊर्फ श्रीरावसाहेब सहस्रबुद्धे ऊर्फ
## श्रीवासुदेवानंत सरस्वती महाराज

श्रीस्वामी समर्थ महाराजांनी आपला स्वरूप संप्रदाय चालविण्याची आज्ञा श्रीबीडकर महाराज यांना दिली. त्यानंतर स्वामी समर्थांनी सद्‌गुरू श्रीबाबा महाराज यांच्या रूपाने सन १८८३ मध्ये हुबळी या क्षेत्री जन्म घेतला. सन १९०६ मध्ये श्रीबीडकर महाराज यांनी सद्‌गुरू बाबांच्या मस्तकावर कृपाहस्त ठेवून श्रीशक्तिपाताने दीक्षा दिली आणि पारमार्थिक पूर्णत्वास पोहोचविले. त्या वेळी श्रीबाबा महाराज नुकतेच इंजिनियरिंगची पदवी (एल.सी.इ) घेऊन बाहेर पडले होते.

ते सद्‌गुरूंचा अनुग्रह प्राप्त केलेल्या क्षणापासून शेवटपर्यंत विदेह अवस्थेमध्येच वावरत होते. श्रीबीडकर महाराज यांनीच त्यांचा विवाह केला. त्यांना एक मुलगी झाली. गृहस्थाश्रमात राहून त्यांनी असि. इंजिनियर म्हणून रत्नागिरी, पेण, महाड, नागोठणा, पनवेल इत्यादी ठिकाणी सरकारी नोकरी केली. सन १९२३ मध्ये वांद्रा येथे चीफ आर्किटेक्ट यांचे पी.ए. म्हणून त्यांची नेमणूक झाली. वरिष्ठ इंग्रज अधिकारी त्यांच्या ज्ञानाचा अधिकार मान्य करीत असत. श्रीबाबा महाराज हे नेहमी अद्वैत आत्मतत्त्वामध्ये रंगलेले असत. एकदा पगाराचे दिवशी ते घरी येत होते. वाटेत भिकारी दिसला. आपला पूर्ण पगार त्याच्या हाती ठेवून ते शांत चित्ताने घरी आले. शेवटी १९२८ मध्ये इन्व्हॅलिड पेन्शन घेऊन ते निवृत्त झाले आणि पुण्याच्या नारायण पेठेत धुमाळ बिल्डिंगमध्ये राहू लागले.

तेथून ते जवळच्या श्रीबीडकर महाराजांच्या मठात रोज तिन्ही त्रिकाळ दर्शनासाठी जात असत. त्यांची वंदन-भक्तीही अनन्य साधारण होती. ते सद्‌गुरूंच्या घरचा पाणक्याच काय, मठाच्या पायरीवरून उतरणाऱ्या मांजरालासुद्धा नमस्कार करीत. कधीकधी अंगात १०५ ताप असला तरी ते आत्मानंदात निमग्न असत. एकदा ते २४ दिवस सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत एकटक सूर्यबिंब पाहण्याची साधना करीत होते.

श्रीबाबा महाराज उच्चविद्याभूषित व वरिष्ठ सरकारी अधिकारी होते, परंतु त्यांच्या पत्नीला लाकडे नसल्याने चूल बंद ठेवायची पाळी येत असे. तरीही त्या परिस्थितीत श्रीबाबा निश्चिंत असत.



धर्मपत्नी निवर्तल्यावर ते पैसे देऊन जेवणाचा डबा मागवत असत. त्यांचे शिष्यसुद्धा त्यांच्यासाठी जेवण किंवा खाद्यपदार्थ घेऊन येत, परंतु ते सर्व ४-४ दिवस तसेच पडून असे. नंतर कधीतरी त्यामधील कणभर खाऊन बाकीचे भक्तांना वाटून टाकत असत. तरीही अनेक वेळा लोकांना त्या शिळ्या वस्तू ताज्या असल्यासारख्या लागत. श्रीबाबा महाराज म्हणत की, "आय वाँट टू स्टार्ट सत्ययुग नाउ" (मला पुन्हा न्याय व धर्माचे सत्ययुग आणायचे आहे).

श्रीमहाराज आपल्या शिष्यांना अगदी सोपा उपदेश करीत असत की, "माणसाने साधे राहावे. आपल्या उपासनेचा गाजावाजा करू नये. सर्वांत प्रथम माणूस बनण्याचा प्रयत्न करा. स्वत:ला पुढारी म्हणवून घेणारे पुष्कळ आहेत, परंतु ज्याने काम-क्रोधादी षड्‌रिपूंचे दमन केलेले आहे, असा देशाचा नेता कोणी नाही. शरीराने काहीही मागावे, म्हणून आपण काय त्याला सर्व द्यायचे?"

तत्कालीन संत-सत्पुरुषांच्या मनात श्रीबाबांच्याबद्दल खूप आदर होता.

श्रीबाबा महाराज शेवटच्या काळात आजारी होते. अशक्तपणा फार होता. अंथरुणावरून हलू शकत नव्हते, त्यामुळे सद्‌गुरूंच्या मठात जाऊ शकत नसत. एकदा श्रीबीडकर महाराज यांची पुण्यतिथीची पालखी निघाली. ती धुमाळ बिल्डिंगवरून जाताना श्रीबाबांनी ताडकन उठून पालखीचे दर्शन घेतले. त्यांच्या नेत्रांतून अश्रू ओघळू लागले. त्यांनी थरथरणाऱ्या हातांनी प्रणाम केला. अशी श्रीबाबांची दृढ गुरुनिष्ठा होती.

सन १९५४ मध्ये श्रीबाबा महाराजांनी पुण्यात आपल्या निवासस्थानी पंचमहाभूतात्मक देहाचा त्याग केला. त्यांचे शिष्योत्तम श्रीदिगंबरदास महाराज यांनी बाबांच्या खासगी जागेत "श्रीबाबा महाराज सहस्रबुद्धे समाधिमंदिर" उभारले.

देहत्याग करण्यापूर्वी त्यांनी आपल्या शिष्यांना आश्वासन दिले की, "तुम्हा भक्तांच्या रक्षणासाठी मी या समाधिमंदिराच्या स्थानी एक हजार वर्षे राहाणार आहे." भक्तांना त्यांच्या वचनाचा नित्य अनुभव येतो.

***

## श्रीबीडकर महाराजांचे प्रशिष्य
## श्रीसद्गुरू बाबा महाराजांचे शिष्य
## श्रीसद्गुरू दिगंबरदास महाराज

देश-जागृतीच्या बाबतीत छत्रपती शिवाजी महाराज व धर्म-जागृतीच्या बाबतीत श्रीसमर्थ रामदास स्वामी यांच्यापासून प्रेरणा घेऊन अखेरच्या क्षणापर्यंत अविरत कार्य करणारे श्रीसद्गुरू दिगंबरदास महाराज यांचे आधुनिक काळातील मराठी संतांमध्ये विशिष्ट स्थान आहे.

श्रीसद्गुरू दिगंबरदास महाराज यांचा जन्म रत्नागिरीजवळील पोमेंडी या गावातील जोशी घराण्यात आश्विन शुक्ल अष्टमी, शक १८३४; गुरुवार, दि. १७ ऑक्टोबर १९१२ रोजी झाला. त्यांच्या वडिलांचे नाव गणेश व आईचे जानकी असे होते. आई-वडिलांनी मोठ्या प्रेमाने श्रीमहाराजांचे नाव विठ्ठल असे ठेवले. वडिलांकडे खोती होती. भरलेले घर होते. विठ्ठल गणेश जोशी हे लहानपणापासूनच ईश्वरभक्त व विरक्त स्वभावाचे होते. वयाच्या १२ व्या वर्षी आईची व १८ व्या वर्षी पित्याची सावली हरपली. आता त्यांच्या मनात सद्गुरू मिळविण्याची इच्छा निर्माण झाली. ते घर सोडून सद्गुरूंच्या शोधात निघाले. योगायोगाने ते पुण्यातील बीडकर महाराज यांच्या मठात गेले. तेथे महद्भाग्याने श्रीबाबा महाराज सहस्रबुद्धे ऊर्फ वासुदेवानंत सरस्वती यांचे दर्शन घडले. गुरू आणि शिष्य दोघेही परस्परांची वाट पाहात होते. श्रीबाबा महाराज यांनी विठ्ठल जोशी यांना बीडकर मठामध्ये दत्तात्रेयावतार अक्कलकोटनिवासी श्रीस्वामी समर्थ यांच्या रूपात दर्शन दिले आणि आपला शिष्य म्हणून त्यांचा स्वीकार केला. श्रीविठ्ठलराव जोशी यांना सद्गुरू मिळाल्यामुळे ते सनाथ झाले.

श्रीमहाराजांनी काही काळ डॉ. बोस लॅबोरेटरीमध्ये मेडिकल रिप्रेझेंटेटिव्ह म्हणून काम केले. या कामात त्यांना मोठे यश मिळाले, परंतु आध्यात्मिक ओढ त्यांना गप्प बसू देत नव्हती. ते सन १९४६ मध्ये नोकरी सोडून रत्नागिरीस परत आले आणि कठोर साधना करू लागले.

श्रीसद्गुरू बाबा महाराज यांनी त्यांना बोलावून घेतले आणि २४ जुलै १९५३ रोजी त्यांनी आपल्या हातातील अंगठी व वळे काढून श्रीमहाराजांच्या



तर्जनीमध्ये घातले. अनुग्रह देताना ते म्हणाले, "गुरूची अंगठी गुरूच्या बोटात घातली आहे. विठ्ठला, आजपासून तुझा सर्व अहंकार मी घेतला आहे. आता तुला स्वत: काही करायची गरज नाही. तुझे सर्व काही मीच करीन."

सद्गुरू श्रीबाबा महाराज यांनी १९५३ मध्ये देहत्याग करायचे ठरविले. सद्गुरूंच्या संकल्पामुळे श्रीमहाराज फार व्याकूळ झाले. त्यांनी आग्रह करून एक वर्ष आणखी राहाण्याचे गुरूंकडून आश्वासन मिळविले. श्रीबाबा महाराज यांनी १८ ऑगस्ट १९५४ रोजी आपली अवतार-लीला संपविली. त्यांची समाधी त्यांच्या खाजगी जागेत, ९३७ डी, चतु:शृंगी मार्ग, शिवाजीनगर, पुणे येथे बांधण्यात आली.

श्रीबाबा महाराज यांच्या समाधीनंतर श्रीमहाराज यांनी आपले जीवन गुरु-सेवेसाठी अर्पण करण्याचा संकल्प केला. समाधी ज्या ठिकाणी उभारली गेली, ती श्रीबाबा महाराजांची मिळकत होती. श्रीमहाराजांनी श्रीबाबा महाराज यांच्या वारस असलेल्या त्यांच्या एकुलत्या कन्या सौ. निर्मलाताई नीलकंठ खरे यांच्याकडून ती जागा लीजवर घेतली व सद्गुरूंचा महिमा वाढविणे, हेच आपले जीवन-कार्य मानले. ते म्हणत असत की, "२४ जुलै १९५३ रोजी माझे म्हणजे विठ्ठल गणेश जोशी याचे अस्तित्व संपले. आता या देहाकडून श्रीबाबा महाराज हेच सर्व काही करून घेत आहेत." आता अशी अवस्था होती -

मी होतो तोवर गुरु नव्हता। आता गुरु आहे, नाही अहंता॥

सुरवातीस समाधिस्थानाची जमीन पडीक व झाडा-झुडपांनी भरलेली होती. श्रीमहाराजांनी ती सपाट करून घेऊन तेथे एक तात्पुरती शेड उभी केली. भक्तांच्यासाठी राहायची सोय केली व हौद बनवून घेतला. रोजच्या पूजेला ताजी फुले मिळावीत म्हणून बाग लावली. स्थानाच्या जवळपासची जमीन खरेदी करून परिसराचा विकास केला. पण दुष्ट लोक हे सत्कर्म सहजपणे करू देत नाहीत. त्यांनी हे स्थान सार्वजनिक आहे, असे म्हणून ते ताब्यात घेण्याचा प्रयत्न केला. कोर्टाची दारे खटखटावी लागली, परंतु श्रीमहाराजांनी हिंमत सोडली नाही. शेवटी देवस्थान हे खाजगी मालकीचे आहे व त्याचे लीज-होल्डर श्रीमहाराज आहेत, असा निकाल झाला. या कुरापत काढणाऱ्या लोकांनी त्रास दिला, तरी श्रीमहाराजांनी

सद्गुरू श्रीबाबा महाराज यांचे समाधिस्थळ सुसज्जित व सुव्यवस्थित बनविले. तेथे आध्यात्मिक उपासना चालू झाली. विधिवत आणि शास्त्रोक्त अनुष्ठाने होऊ लागली. श्रीबाबा महाराजांची जयंती, पुण्यतिथी, श्रीदत्तजयंती, श्रीस्वामी समर्थ जयंती, श्रीराम नवमी, गणेश चतुर्थी, श्रीकृष्ण-जन्माष्टमी यासारखे उत्सव मोठ्या उत्साहाने साजरे होऊ लागले. असंख्य भक्त या ठिकाणी येऊन कृपा-प्रसाद घेऊ लागले.

श्रीमहाराज यांचे व्यक्तित्व अनेक लोकोत्तर गुणांनी मंडित होते. त्यांच्या संपर्कात आलेल्या कोणत्याही व्यक्तीचे नाव, गाव, कुटुंब, नोकरी-व्यवसाय इत्यादीची माहिती त्यांना असे, मग तो कितीही दिवसांनी भेटो. साधेपणा, स्वच्छता, शिस्त, वक्तशीरपणा, उदारता, सहृदयता इत्यादी गुणांमध्ये त्यांची बरोबरी कोणी करू शकणार नाही. लहानांपासून थोरांपर्यंत सर्वांशी त्यांचे प्रेमाचे व जिव्हाळ्याचे संबंध असत. लोकांना काही अडचण असेल, तर श्रीमहाराज ती निवारण करीत. कधी गरज पडल्यास एखाद्याची कठोर शब्दात कान-उघडणीही करीत असत. त्याचबरोबर भक्ताला एखाद्या लहानशा गुणाबद्दल शाबासकी देऊन त्याला आपल्याजवळ जेवायला घेऊन बसत. सेवेकऱ्यांच्या अडीअडचणी दूर करण्याचा प्रयत्न करीत असत. स्थानामध्ये पाळलेले पोपट, कुत्रे या प्राण्यांना वेळेवर खायला-प्यायला मिळावे, म्हणून ते काळजी घेत असत. ते खरे संत-सत्पुरुष होते.

श्रीमहाराज हे स्थानामध्ये येणाऱ्या लोकांना कायदेशीर सल्ला देत असत. ते पाहून मोठमोठे कायदे-पंडित चकित होत. त्यांची बुद्धी विलक्षण होती. ते वैद्यकीय इलाज करण्याबद्दल किंवा व्यावसायिक अडचणींबद्दल अचूक मार्गदर्शन करीत असत. समाधिस्थानाच्या बांधकामाचे वेळी ते इंजिनियर्सनासुद्धा काय बरोबर आहे व काय चूक आहे, हे समजावून देत.

मंदिरातील उत्सवांच्या प्रसंगी पालखी निघत असे, तेव्हा श्रीमहाराज स्वत: पदे रचून गात असत आणि त्यांचे रसाळ निरूपण करीत असत. ते शीघ्र कवी होते. कीर्तनाच्या वेळी त्यांच्या मुखातून पदे आपोआप झरू लागत. त्यांनी शेकडो-हजारो पदे बनविली व गायली. दुर्दैवाने आज त्यातील लिखित अशी



थोडीच उरली आहेत. ते तबला-पखवाज अशी वाद्ये वाजविण्यात तरबेज होते. ते नाटकात काम करावयाचे. ते शिल्पकारही होते. पोमेंडीत असताना ते गणेश-मूर्ती बनवीत. त्यांच्या ठिकाणी चित्रकलेची प्रतिभाही होती. ते चित्रकार, शिल्पकार यांना योग्य सल्ला देत असत.

श्रीमहाराज हे शेतीमधील मोठे जाणकार होते. त्यांनी स्वत: नांगर जोडून शेती केली होती. शेतीतील नव्या-जुन्या पद्धती, मातीचा सुपीकपणा, खत, बियाणे इत्यादींबद्दल ते एखाद्या अनुभवी शेतकऱ्यास मागे टाकत. त्यांनी जनावरांचा गोठा बनविला होता. गोठे स्वच्छ असावेत व जनावरे पुष्ट असावीत, याची ते काळजी घेत असत. म्हातारी जनावरे कसायाला विकण्यास त्यांचा विरोध होता. प्राण्यांकडून जन्मभर सेवा करून घेऊन शेवटी त्यांना कसायाला विकणे, म्हणजे कृतघ्नपणा होय, असे ते मानीत असत.

वेद आणि वेदप्रणीत मार्गाने जाणाऱ्या ब्राह्मणांबद्दल त्यांना अपार श्रद्धा होती. ते म्हणत असत, 'ब्राह्मणो मम दैवतम्' ब्राह्मणांनी हजारो वर्षे मोठ्या कष्टाने वेदांचे रक्षण केले. याबद्दल त्यांचे ऋणी असले पाहिजे. ब्राह्मणांचा यथोचित गौरव करण्यासाठी ते अनेक अनुष्ठाने करीत व दूरदूरच्या ब्राह्मणांना बोलावून त्यांच्या निपुणतेबद्दल आणि विद्वतेबद्दल कृतज्ञता व्यक्त करून उदारपणे त्यांचा सन्मान करीत.

श्रीमहाराजांचे ठिकाणी जाज्वल्य धर्मनिष्ठेबरोबरच ज्वलंत देशनिष्ठा होती. त्यांच्या शब्दांतून व आचरणातून देश-प्रेम प्रगट होत असे. त्यांनी देवस्थानामध्ये राष्ट्रध्वज उभारून स्वातंत्र्यदिन व प्रजासत्ताक दिन साजरे करण्याची प्रथा सुरू केली. त्यांनी स्वत: १९४२ च्या स्वातंत्र्य लढ्यात काम केले होते. त्या वेळी गावोगावी जाऊन ते राष्ट्रीय जागृती करीत असत व गुप्तपणे चळवळीचे काम करीत होते. रत्नागिरीमध्ये जेव्हा स्वातंत्र्यवीर सावरकर होते, तेव्हा श्रीमहाराज त्यांना भेटून चर्चा करीत असत. डेरवण येथील श्रीशिव-समर्थगड उभारण्यात त्यांची हीच राष्ट्रीय प्रेरणा दिसून येते.

श्रीमहाराजांनी श्रीबाबा महाराज सहस्रबुद्धे यांच्या पुण्यातील समाधि-स्थानाबरोबरच डेरवण येथेही आपले कार्यक्षेत्र चालू केले. चिपळूणच्या परिसरात

अक्कलकोटनिवासी श्रीस्वामी समर्थ यांच्या परंपरेतील एक सत्पुरुष श्रीसंत दिगंबरबुवा वहाळकर हे होऊन गेले. त्यांच्याशी श्रीमहाराजांची जुनी ओळख होती. श्रीवहाळकरबुवा यांचे शिष्य श्रीसंत सीतारामबुवा वालावलकर यांच्याबद्दल श्रीमहाराजांच्या मनात फार प्रेम होते. सद्गुरू श्रीबाबा महाराज यांनी श्रीसीतारामबुवा यांची काळजी घेण्यास श्रीमहाराज यांना सांगितले होते; म्हणून ते वारंवार सावर्डे येथे जाऊन श्रीसीतारामबुवा यांची सेवा करीत. सावर्डे येथे बुवांची हेळसांड होत आहे, असे पाहिल्यावर श्रीमहाराज यांनी जवळच्या डेरवण गावातील काही जमीन घेऊन तेथे बुवांच्यासाठी घर बनविले आणि थोड्या शेतीची व्यवस्था करून दिली. त्यांनी "श्रीसंत सीतारामबुवा वालावलकर चॅरिटेबल ट्रस्ट" निर्माण केला व तेथे मोठमोठी कामे करण्याचा संकल्प सोडला. त्यांनी जवळपासची बरीच जमीन खरेदी केली. तेथील गरीब लोकांना सावकार, मुसलमान व राजकीय पुढारी यांचा फार त्रास होत होता. श्रीमहाराजांच्या ट्रस्टकडून गरिबांना अन्न, वस्त्र, घोंगडी इत्यादी मोफत दिले जाऊ लागले. त्यांना रोजगार दिला गेला. त्यांच्यासाठी औषधोपचाराची मोफत सोय केली. त्यांना शेतीच्या नवीन पद्धतीची ओळख करून दिली. त्यांच्या वाईट सवयी दूर करण्यासाठी श्रीमहाराज प्रयत्नशील असत. त्यांच्या मुलांना शिकविण्यासाठी प्रोत्साहन दिले जाई. त्यांना वह्या, पेन्सिली, पुस्तके इत्यादी मोफत दिले जाई. त्यांची गवताने शाकारलेली घरे पावसाळ्यात गळत असत म्हणून श्रीमहाराजांनी तेथील हजारो घरे मंगलोरी कौलांनी मोफत शाकारून दिली. जवळपासच्या गावांमध्ये पाण्याची कमतरता होती, म्हणून ट्रस्टकडून वीस मैलांवरून पाणी आणून टँकरने पुरवठा केला जाऊ लागला.

श्रीमहाराज गरिबांच्या गरजा पुरवण्याबरोबरच त्यांच्यामध्ये धर्म-प्रेम व देश-प्रेम यांची जाणीव निर्माण करू इच्छित होते. यामुळे त्या परिसरातील आपमतलबी लोकांच्या स्वार्थाला धक्का पोहोचू लागला. गरिबांना लाचार बनवून त्यांचे शोषण करण्याचे त्यांचे प्रयत्न व्यर्थ ठरू लागले. त्यामुळे ते कुरापती काढून त्रास देऊ लागले. परंतु श्रीमहाराजांनी खंबीरपणे त्याला तोंड दिले आणि आपले लोक-कल्याणाचे काम नेटाने सुरू ठेवले.

लोकांच्या समोर राष्ट्रनिष्ठा व धर्मनिष्ठा यांचा आदर्श ठेवण्यासाठी



श्रीमहाराजांनी छत्रपती शिवाजी महाराज आणि श्रीसमर्थ रामदास स्वामी यांचे अद्वितीय स्मारक 'श्रीशिव-समर्थगड'च्या रूपाने डेरवण येथे उभारले आहे. डेरवण येथे शिवजयंतीचा उत्सव मोठ्या थाटाने साजरा केला जातो. हजारो शिव-प्रेमी आणि वारकरी भक्त मोठ्या प्रेमाने उत्सवाच्या वेळी भव्य मिरवणुकीत सहभागी होऊन तो परिसर शिवप्रेमाने व धर्मप्रेमाने भारून टाकतात.

श्रीमहाराजांनी प्रसिद्धीपासून दूर राहून लोक-कल्याण आणि परमार्थ-साधन यासाठी अविश्रांत श्रम जन्मभर केले व आर्यधर्माचा ध्वज नेहमी फडकवीत ठेवला. हे कार्य करीत-करीत त्यांनी वैशाख कृष्ण प्रतिपदा, शक १९११; रविवार, दि. २१ मे १९८९ रोजी देह ठेवला.

आज त्यांच्या कार्याचा विस्तार झालेला आहे. त्यांचे उत्तराधिकारी प. पू. श्रीअशोककाका महाराज हे संपूर्ण शक्तीनिशी आपल्या सद्गुरूंचे वैभव वाढविण्यासाठी कार्यरत आहेत. श्रीमहाराजांच्या प्रेरणेने डेरवण येथे, श्रीस्वामी समर्थ-श्रीराम मंदिर आणि स्वामी समर्थ उद्यान उभारले गेले आहे. जवळच सुसज्ज अशी इंग्रजी शाळा आणि श्रीमहाराजांचे शिष्योत्तम भक्तश्रेष्ठ कमलाकरपंत लक्ष्मण वालावलकर यांच्या नावाने फार मोठे रुग्णालय उभे राहिले आहे. हे २०० खाटांचे रुग्णालय सुसज्ज असून, येथे सर्व वैद्यकीय सुविधा व उपचार आहेत. हे इंटरनेटने जोडले असून देशातील व विदेशातील तज्ज्ञ डॉक्टर येथे येतात. डॉ. बाणावली यांच्या प्रयत्नामुळे व मुंबईच्या टाटा मेमोरियलच्या मदतीने कॅन्सरच्या तपासणीसाठी व प्रतिबंधासाठी तीन जिल्ह्यांत ८० डॉक्टर्स व कर्मचारी यांचे पथक झटत आहे. तोंडाच्या व गर्भाशयाच्या कॅन्सरच्या शस्त्रक्रिया येथे मोफत केल्या जातात. तेथे एक सुसज्ज नर्सिंग कॉलेज उघडले आहे. मुंबई (अंधेरी पश्चिम) येथे अक्कलकोट निवासी श्रीदत्तात्रेयावतार भगवान श्रीस्वामी समर्थ यांचे फार सुरेख मंदिर बनले आहे. या सर्व ठिकाणी नित्य-नैमित्तिक अनुष्ठान व उत्सव साजरे केले जातात, त्यामुळे धर्मजागृती आणि लोकांचे चारित्र्य घडविण्याचे मोठे काम चालले आहे. ते श्रीमहाराजांची अक्षय कीर्ती पसरवीत आहे.

* * *

# ॥ श्रीसद्गुरू रामानंद स्तवराज ॥

( श्रीबीडकर महाराजांचे प्रशिष्य आणि श्रीबाबा महाराज सहस्रबुद्धे यांचे शिष्य
श्री. वि. ग. जोशी ऊर्फ श्रीदिगंबरदास महाराज द्वारा रचित )

संसारी बहु कष्ट होऊनि तुला झालासि बा आर्त तूं।
शोधाया निजदेव हिंडसि जनीं सांडोनियां स्वार्थ तूं।
श्रीस्वामी गुरुदत्त भेटुनि तुला केले तुझे सार्थक।
रामानंदगुरो तुझ्या पदिं अतां ठवीतसें मस्तक॥ १

स्वामींनीं कर ठेवितां शिरिं तुझ्या तुर्या सुखा लाभसी।
होवोनी मन पूर्ण उन्मन तुझें मुक्तीसुखीं रंगसी।
मांडोनी सकलार्थ लौकिक इथे झालासि रूपोन्मुख।
रामानंदगुरो तुझ्या पदिं अतां ठेवीतसें मस्तक॥ २

गुर्वाज्ञा शिरिं मान्य ती करुनियां गेलासि रेवातटीं।
तेथें कष्ट बहू करुनि फिरसी त्या नर्मदेच्या तटीं।
गोसावी बहु पीडुनी तुजसि बा झाला तुझा सेवक।
रामानंदगुरो तुझ्या पदिं अतां ठेवीतसें मस्तक॥ ३

फत्तेगीरबुवांसि बोधुनि तुवां सद्-ज्ञान त्या दीधलें।
सानेस्वामिप्रती निजात्महित तें, त्वां सत्य बा दाविलें।
पूर्णानंद गुरुस्वरूप तुजला भेटे 'तृषा'हारक।
रामानंदगुरो तुझ्या पदिं अतां ठेवीतसें मस्तक॥ ४

व्याघ्राचे स्वरूपा धरोनि तुजला स्वामी तिथे भेटती।
आहे मी अजुनी अशी तुजप्रती देती प्रचीतीच ती।
त्यांपायीं नमितां निगर्व बनसी स्वामी तुझे तारक।
रामानंदगुरो तुझ्या पदिं अतां ठेवीतसें मस्तक॥ ५

नक्रींयुक्त जलाशयांत बुडतां त्वां कौतुका दाविलें।
देहप्रीति कशी जिवांसी भुलवी संन्यासिया बोधिलें।
सत्यज्ञान प्रचीती देऊनि तयां झालासि संरक्षक।
रामानंदगुरो तुझ्या पदिं अतां ठेवीतसे मस्तक॥ ६



मोहाया तुजला मठाधिपतीची कन्या जधीं पातली।
अंतर्मूख करोनि वृत्ति अपुली त्वां वेळ ती जिंकिली।
तजध्यानिं क्षणोक्षणीं रमुनियां, होसी जिवा प्रेरक।
रामानंदगुरो तुझ्या पदिं अतां ठेवीतसे मस्तक। ७

वेडा हट्ट धरोनि मागत तुला "देई मला बाण" तो।
जावोनी जलिं "चंद्रशेखर" दिला झाला तयीं शांत तो।
लोकीं पाहुनियां चमत्कृति अशी केलें तुझें कौतुक।
रामानंदगुरो तुझ्या पदिं अतां ठेवीतसे मस्तक॥ ८

देशी सत्वर कान्यकुब्ज वनिते लागीं प्रचीती खरीं।
आत्मानात्म विचार बोधिं रमतां तद्रूपता ते वरी।
द्वंद्वातें त्यजुनी सदा हससि तूं सद्बुद्धिचा प्रेरक।
रामानंदगुरो तुझ्या पदिं अतां ठेवीतसे मस्तक॥ ९

वेदांसी पर जें निजात्मसुख ते त्वां अंतरी भोगिलें।
नित्यानंद पदीं सदैव बसुनि सच्छिष्य ते तारिले।
शिष्या रक्षुनियां इहार्थ परहि देसी तयां सत्सुख।
रामानंदगुरो तुझ्या पदिं अतां ठवीतसें मस्तक॥ १०

स्वामीच्या वचनें जिवासि तरण्या देसी खरा मार्ग तो।
बोधे "तत्त्वमसि" प्रबुद्ध करिसी जो कीं भवा नाशितो।
पूर्णप्रेम कृपार्द्र दृष्टी तव बा त्रीताप संहारक।
रामानंदगुरो तुझ्या पदिं अतां ठेवीतसें मस्तक॥ ११

बाबांचे शिरिं हस्त ठेवुनि तुवां नेले परेच्या पर।
रूपी रंगवुनी कृतार्थ करूनी आज्ञापिलें सत्वर।
चालाया जगिं संप्रदाय अपुला केलें तया तारक।
रामानंदगुरो तुझ्या पदिं अतां ठेवीतसें मस्तक॥ १२

तुझ्या पुण्यदिनी तुझ्याच चरणी, वाक्पुष्प हे अर्पितों।
तेणे तोषुनियां जिवांसि सुखवी, याची वरा मागतों।
दासासी स्वरुपीं सदा स्थिरवुनी, देई स्वरूपी सुख।
( दे आत्मरुपी सुख। )
रामानंदगुरो तुझ्या पदिं अतां ठेवीतसें मस्तक॥ १३

रामानंद स्तवासि या पठती जे निरंतर।
यशकीर्ति तया लाभे होती ते हर्षनिर्भर।
दुःखदैन्य हरोनियां धनधान्य समन्वित।
होवोनी इष्ट कार्यासी साधे त्यां आपुले हित॥ १४

॥ श्रीसद्‌गुरुचरणारविंदार्पणमस्तु ॥

## श्रीबीडकर महाराज यांची जन्मकुंडली

**(ज. स. ऊर्फ तात्यासाहेब करंदीकरकृत)**

जन्म शके १७६०, माघ शुद्ध ७, अष्टमीचा क्षय, मंगळवार, वेळ-दोन प्रहर, इंग्रजी तारीख २२ जानेवारी १८३८, जन्म नक्षत्र - अश्विनी, चतुर्थ चरण, मेष राशी, सूर्य महानक्षत्र, श्रवण, रवी मकर राशीत




जन्मलग्नात चंद्र असल्याने वेगळी राशिकुंडली मांडलेली नाही. जन्मवेळ नक्की झालेली नाही. मोघम दोन प्रहर म्हटले आहे. त्यामुळे जन्मलग्न मीन धरावे, की मेष याबद्दल लोकांस शंका वाटते, परंतु जातकतत्त्वाप्रमाणे सगळे योग तपासून पाहता जन्मलग्न मेष हेच निश्चित आहे.



**श्रीबीडकर महाराज यांचे विचार**

## कौटुंबिक सुखाची गुरुकिल्ली

### १. घरातील धुसपूस

घरात जर एक भाऊ मिळविता असेल आणि दुसरा भाऊ बेकार असेल, तर आपल्या श्रमामध्ये व संपत्तीमध्ये दुसऱ्या भावानेही वाटेकरी व्हावे, असे वाटण्याजोगे मोठे मन मिळवित्या भावाकडे नसते. मग त्यांच्या बायकांमध्ये लहान-मोठेपणाची भावना पसरू लागते. नणंदा-भावजया यांचे पटत नाही. सासू-सुनेचे पटत नाही. घरातील कर्त्या पुरुषाची कोती बुद्धी, हेच याचे मुख्य कारण होय. त्याचे दुर्लक्ष झाले की चुगल्या-चहाड्या सुरू होतात. त्यावर विश्वास ठेवला की कुटुंबाची इमारत ढासळू लागते. खाण्या-पिण्यावरून व कधी-जास्त कामावरून घरात वितुष्टे येऊ लागतात. काम केल्यामुळे मनुष्य झिजत नाही किंवा काम न केल्याने मनुष्य वाढत नाही. एखाद्याने चिमुटभर जास्त खाल्ले किंवा कपडे चांगले वापरले तर मनात खळबळ माजविणारी क्षुद्र व कोती बुद्धी का धरावी? दैवाने मिळाले आहे, त्यात आनंद मानावा. मनाची क्षुद्रता, कोतेपणा, कुत्सितपणा व असहिष्णुता या अवगुणांमुळे पापांमध्ये भर पडते. आप्त-इष्ट व आश्रित लोकांच्या असंतोषामुळे आपल्याच भरभराटीला अडथळा येतो, म्हणून या गोष्टी आगीसारख्या जाळून राख करून टाकणाऱ्या आहेत, असे समजून त्यांच्यापासून भिऊन वागाव

### २. भाऊबंदकी

भाऊबंदकीचे मूळ अत्यंत लोभ, मत्सर व अहंमन्यता यामध्ये असते, "मी मोठा" असा अहंकार बाळगू नका. आपल्या प्राप्तीतील थोडा वाटा दुसऱ्या भावाकडे गेला, तर घासाघीस करू नका. तो काही चोराने नेला नाही, आपल्या भावाकडेच गेला, असे म्हणण्याजोगे उदार मन बाळगा. आपले पारडे हलके

होते, म्हणून दुसऱ्याच्या पारड्यातील काढून घेऊ नका. त्याऐवजी आपल्या पारड्यात दुसऱ्या गोष्टींची भर घालण्याची ईर्षा बाळगा. घरच्या भांडणात कुणाला मध्यस्थ करू नका किंवा कोर्टबाजी करू नका. त्यात अपयशच असते. थोडी धस सोसून मोठेपणा मिळवा. आप्तजनांच्या तळतळाटामुळे जितके नुकसान होते, तितके नुकसान शत्रूची तलवारसुद्धा करू शकत नाही.

* * *

## श्रीबीडकर महाराजांची आरती

जय देव जय देव जय जय गुरुराया।
सद्‌गुरु रामानंदा करुणाकर सदया॥ ध्रु० ॥

स्वामी-सांप्रदायीं उच्चतम तुम्हीं।
स्वरूपानुसंधानीं रत आत्मारामीं।
निजदेह कष्टविला जनहित कामी।
शब्द अपुरा पडे तव गुण वर्णाय॥ १

देहीं आत्मा दावुनि जडजन उद्धरिले।
बोधामृत पाजोनी भवपार केले।
इहपर सुखमय-जीवन निजशिष्यां दिधलें।
चरणस्पर्शे जाई पळुनी दुरि माया॥ २

जीव-शिव ऐक्य तुम्हीं घडवीतां।
सोऽहं-भावें आत्म-रंगीं रंगवितां।
करुणासागर गुरु हो भक्तां उद्धरितां।
दास विठू वंदितसे पदकमलांसी या॥ ३

॥ श्रीसद्‌गुरुचरणारविंदार्पणमस्तु ॥

* * *